


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका










# । केशवसुत ।

वाग्देवी शारदे गे! फिरवुनि अपुले शब्द पाचार येथें!
साहाय्यावीण त्यांच्या भजन तव कसें सांग साधेल मातें?
आशामेघालि चिन्तानल अजि विझवूं पाहतीसे तयार,
शब्दांनो! मागुते या! बहर मम मनीं नूल येईल फार! ४


**मराठी अभ्यास परिषद पत्रिका**

# भाषा आणि जीवन

**। वर्ष १५ : अंक २ । उन्हाळा १९९७ ।**




अनुक्रमणिका

## अनुक्रम



---

प्रकाशन : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

संपादन-समिती : कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर.

संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक : कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ४११ ००७ (दूरध्वनी : ३५६०६१ / २१८७; निवास : ४३५६०३)

व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे - ४११ ००४ (दूरध्वनी : ३३३८६९)

पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर : आवरण पृष्ठ तीन पहा.



या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

संपादकः कल्याण काळे, प्रकाशक व मुद्रकः मराठी अभ्यास परिषदेसाठी-मृणालिनी शहा
मुद्रण स्थळ : सहकार मुद्रणालय, ५४० गणेश पेठ, पुणे २.

संपादकीय

# जातीची चिवट भाषा

मृणालिनी शहा

चरितार्थासाठी, उद्योगधंद्याच्या निमित्ताने किंवा नोकरीच्या निमित्ताने एका प्रांतातील लोक दुसऱ्या प्रांतात जातात व नंतर तिथेच स्थिरस्थावर होतात. तथापि आपला धर्म, जात चालीरीती, प्रांतिक वैशिष्ट्ये आणि भाषा याबाबतीतले आपले वेगळेपण जपण्याचा आटोकाट प्रयत्न हे स्थलांतरित लोक करत असतात. आणि ते स्वाभाविकही आहे. जगाच्या पाठीवर आढळणारे ते एक सार्वत्रिक सत्य आहे. मात्र ते जिथे स्थायिक होतात त्या समाजाची, प्रांताची भाषा आत्मसात करतात. सामाजिक विनिमयाची, संप्रेषणाची ती एक प्राथमिक गरज असते. जसजसा काळ जातो तसतशा तिथल्या चालीरीती व प्रांतिक वैशिष्टये स्वीकारली जातात. समाजात अशा प्रकारचे आदानप्रधान नेहमीच होत असते. भाषेच्या बाबतीतही ही आदानप्रदान प्रक्रिया घडत असते. त्यातूनच नवनवीन बोली निर्माण होत असतात. बदलत राहणे हा भाषेचा विशेष आहे. स्थलांतरीत लोकांच्या मूळ भाषेवर स्थानिक भाषेचा परिणाम होऊन त्यांच्या मूळभाषेची एक नवीन बोली तयार होते. ती तशी नवी बोली बोलण्याचा अट्टाहास या लोकांकडून सतत केला जातो. आपला प्रदेश सोडला तरी ज्या प्रमाणे आपला धर्म, जात आणि रीतीरिवाज लोक सोडत नाहीत त्याप्रमाणे आपली भाषादेखील सोडायला लोक तयार नसतात. याचे मूळ कारण जात, धर्म आणि प्रदेश यांच्या स्वाभिमानातच असण्याची शक्यता नाकारता येत नाही. स्थलांतरित लोकांच्या या भाषिक प्रेमाचे, भाषिक धोरणाचे आणि भाषिक वैशिष्ट्यांचे अवलोकन करणे कधी कधी मनोरंजक ठरते.

येथे गुजरातमधून महाराष्ट्रात स्थलांतरित झालेला श्वेतांबर जैन समाजाच्या भाषिक वैशिष्ट्यांची काही निरीक्षणे मांडण्याचा प्रयत्न केला आहे. येथे श्वेतांबर जैन समाज ही मर्यादा जाणीवपूर्वक आखून घेतली आहे. कारण गुजरातमधून आलेल्या सर्व लोकांची भाषा वरवर पाहता गुजरातीच वाटत असली तरी लोकांच्यां धर्माप्रमाणे, जातीप्रमाणे तिच्यात गुजरातच्या उपबोली असतात. उदा. वैष्णवांची बोली, जैनांची बोली किंवा भंगीजातीची बोली असे त्यात पुष्कळ भेद आहेत. शिवाय त्यांच्या त्यांच्या जातीप्रमाणे त्यांचे भाषेसंबंधीचे धोरण व निकषही भिन्न असतात. सर्वसामान्य मराठी भाषकांच्या ते लक्षात येत नाहीत म्हणून हा खुलासा, आता हा महाराष्ट्रातील गुजराती श्वेतांबर जैन समाज

वरवर पाहता गुजराती बोलत असला तरी त्यातही भेद आहेत. गुजरातमधील ज्या ज्या जिल्ह्यांतून हे लोक आलेले आहेत.त्या त्या जिल्ह्यातील भाषिक भेद येथेही त्यांनी सांभाळलेले आहेत, असे दिसते. महाराष्ट्रभर विखुरलेल्या या समाजातील भाषेमध्ये इथल्या जिल्ह्याप्रमाणे[1] देखील भिन्नता दिसून येते. उदा.पुण्यातील गुजरातीपेक्षा अकोला जिल्ह्यातील गुजरातींमध्ये खूपच फरक आहे.

जैनांमधील जाती-उपजातींची भाषा विषयक धोरणे जातिपरत्वे निरनिराळी आहेत. त्याचा विचार तर समाजशास्त्रीय दृष्ट्या खूपच उद्‌बोधक आहे. परंतु तो स्वतंत्र लेखाचा विषय असल्याने तूर्त बाजूला ठेवला आहे.

पिढ्यान्‌पिढ्या महाराष्ट्रात राहिल्याने जैनसमाजाचे मराठी भाषेशी आणि मराठी समाजाशी घनिष्ठ संबंध प्रस्थापित झाले आहेत. ७०ते७५ टक्के लोकांच्या शिक्षणाचे माध्यमही मराठीच असते. कित्येकांचे मराठी भाषेवर प्रभुत्वही दिसून येते. मात्र तरीही ७० टक्के लोकांनी आपली प्रातिक भाषा गुजराती (जैन धर्माची भाषा नसूनही) सोडलेली नाही. कुटुंबाकुटुंबातून ती जिवंत ठेवली आहे. एवढेच नाही तर ती भाषा बोलण्याचा आग्रहही त्यांचे कुटुंबप्रमुख आणि समाजधुरीण धरतात. त्यांच्या जातीमधली ती एक प्रतिष्ठेची बाब समजली जाते असावी. त्यामागे धार्मिक अस्मिताही असण्याची शक्यता नाकारता येत नाही. परप्रांतातही आपली भाषा टिकवण्याच्या आग्रहामुळे या समाजातील कुटुंबाचे व्यक्तिपरत्वे जे भाषिक भेद निर्माण होतात, त्या संबंधीची काही निरीक्षणे येथे मांडली आहेत.

स्थूलमानाने या समाजाचे भाषिकदृष्ट्या दोन गटांमध्ये विभाजन करता येते. अ) घरामध्ये गुजराती आणि जैनेतर समाजाशी मराठी बोलणारा गट यांची मातृभाषा गुजराती असली तरी त्यांना मराठी येत असते. आ) गुजराती जैन असूनही गुजराती न बोलणारा दुसरा गट या गटातील लोकांची मातृभाषा आता मराठीच असते.

या गटांची सामाजिक आणि भाषिक वैशिष्ट्ये थोडक्यात अशी सांगता येतात. महाराष्ट्रात श्वेतांबर जैन लोकांमध्ये दोन प्रमुख जाती दिसतात. एक विशाश्रीमाळी आणि दुसरी दशाश्रीमाळी. या दोन जातींची भाषिक धोरणे भिन्न आहेत. आता पहिलेल्या भाषिक गटांमध्ये या जातींचा समावेश असा करावा लागतो. पहिल्या गटातील म्हणजे गुजराती मातृभाषा असणारे लोक सामान्यतः विशाश्रीमाळी आहेत. व ते भाषिकदृष्ट्या सनातनी विचारांचे असतात. तर दुसऱ्या गटातील लोक दशाश्रीमाळी असून त्यांचे भाषिक धोरण उदार असते. अर्थात ही विभागणी काटेकोर नाही हे लक्षात घ्यावे..

आपण वर पाहिलेल्या जातीजातींमध्ये रोटी व्यवहार पूर्वापार चालत आलेला आहे. बेटीव्यवहारही आता पन्नास वर्षांपासून सर्रास चालू झालेला आहे. या बेटी व्यवहारातून मराठीभाषक दशाश्रीमाळींच्या मुली गुजरातीभाषक विशाश्रीमाळींच्या घरात आणि गुजरातीभाषकांच्या मुली मराठी भाषकांच्या घरात नांदताना दिसतात. सासरची आणि

माहेरची भाषा भिन्न असणाऱ्या मुलींच्या बाबतीत भाषेच्या अस्मितेचा प्रश्न उपस्थित होतो. कारण ती भाषा त्यांच्या जातीची भाषा असते अशा भिन्न भाषांचा प्रश्न येणाऱ्या बहुतांशी मुली दिल्या घरातली भाषा शिकून घेतात. म्हणजे मराठी भाषक मुलीला गुजराथी शिकावे लागते. गुजराती भाषक मुलीला मराठी येतच असल्याने फारसा त्रास होत नाही. पण नव्याने गुजराती शिकणाऱ्या मुलीला भाषिक व्यवहारात बऱ्याच अडचणी येतात पण स्त्रीस्वभावानुसार त्या सासरची भाषा स्वीकारून मोकळ्या होतात.

काही मुली मात्र आपले भाषिक वेगळेपण राखण्याचा जोरकस प्रयत्न करतात. अशी एकदोन उदाहरणे पाहणे गंमतीचे ठरेल. सासरची मंडळी स्त्रीच्या भाषिक अडचणी समजावून घेणारी व भाषिक धोरणात उदारमतवादी असली तर त्या कुटुंबात एकाच वेळी दोन भाषा सुखाने नांदताना दिसतात. उदाहरण घेऊन पहायचे म्हटले तर-मराठी भाषा बोलणाऱ्या सुनेशी घरातील सर्वजण मराठी बोलतात. व ती सोडून इतरजण एकमेकांशी गुजराती बोलतात. नवरा बायकोच्या संवादाची भाषाही मराठीच राहते. येथे आपापले भाषिक वेगळेपण राखण्यात फारसा प्रत्यवाय येत नाही. आपण वर पाहिलेच आहे की या गुजराती भाषकांना मराठीही चांगले येत असते. सुरुवातीला सर्व बरोबर होते मात्र पुढे अशा जोडप्यांच्या मुलांच्या भाषेचा प्रश्न निर्माण होतो. एकत्र कुटुंबात वाढणारी मुले दोन्ही भाषा शिकतात. आईशी मराठी बोलतात व इतरांशी (वडिलांसह) गुजराती बोलतात. या मुलांची मातृभाषा कोणती? आईची की वडिलांची? असा प्रश्न उभा राहतो. येथे घराची भाषा ती त्यांची भाषा म्हणता येईल. अशा काही उदाहरणांमध्ये ५/१०/ वर्षांनी ती मराठी प्रेमी मुलगी हळूहळू मुलांशीही गुजरातीच बोलू लागते.

याच पद्धतीच्या काही उदाहरणांमध्ये ज्या कुटुंबातील लोकांची संख्या कमी असते तिथे मात्र उलट परिस्थिती दिसून येते. मराठी बोलणाऱ्या आईच्या मुलाशी वडीलही मराठीच बोलू लागतात (आईशी तर ते आधीपासून मराठीच बोलत असतात) एवढेच नाही तर घरातील आजीआजोबा पण मराठी बोलू लागतात आणि मग त्या घरात मराठी भाषकांची संख्या अधिक होते व त्या घराच्या भाषेला मराठीचे वळण मिळते. येथे त्या मुलांची मराठीही खऱ्या अर्थाने मातृभाषा होते. या मुलांचे वडील मात्र आपल्या आईवडिलांशी किंवा इतर नातेवाईकांशी व जैनसमाजातील लोकांशी मात्र त्यांच्या मातृभाषेतून म्हणजे गुजरातीतून बोलतात. त्यांच्या गुजराती भाषाव्यवहाराला मर्यादा पडतात. एखादी स्त्री आपली भाषाच कुटुंबाची भाषा करू शकते याचे हे उदाहरण स्त्रीवादी दृष्टिकोनातून तपासून पाहता येईल.

शहरातील याहून थोडे निराळे असे एक उदाहरण पाहूया. एक गुजराती भाषक मुलगी खेड्यातील मराठी भाषकांच्या घरात सून म्हणून जाते तिथे तिला मराठीही जुळवून घेताना फारसा त्रास होत नाही कारण तिला मराठीही चांगले येत असते. पण आपल्या मुलांना गुजराती आलेच पाहिजे असा तिचा आग्रह राहतो. कारण ती तिच्या माहेरची भाषा असते, ती तिची मातृभाषा असते आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे ती भाषा तिला प्रतिष्ठेची वाटत





अनुक्रमणिका

असते. म्हणून मग ही स्त्री आपल्या मुलांशी ती जन्मल्यापासून गुजराती बोलते. यावेळी मुलाशी घरातील सर्वजण मराठी बोलत असतात. मुले एकाच वेळी दोन भाषा सहजगत्या शिकतात. आईशी गुजरातीत व घरातील सर्वांशी (वडील, आजी-आजोबा) मराठीत संभाषण करतात. वर्षानुवर्षे या अशा घरात गुजराती व मराठी भाषा एकत्र नांदत आहेत. या कुटुंबातील मुले कौटुंबिक गप्पा मारत असताना सटासट भाषा बदलतात. त्यांच्या संभाषणात कोठेही अडथळा येत नाही. हा भाषाव्यवहार पाहून नवीन माणसाला आश्चर्य वाटल्यास नवल नाही. आता या घरातील भावंडे एकमेकांशी कोणती भाषा बोलत असतील? इथे मात्र वडिलांच्या भाषेचा म्हणजेच मराठीचा प्रभाव दिसतो. आईने जाणीवपूर्वक गुजराती शिकवल्याने जैन समाजात वावरताना त्यांना गुजराती सहजपणे वापरता येते. आपली प्रतिष्ठा निर्माण करता येते. या स्त्रीच्या नवऱ्याला, सासूसासऱ्यांना काही भाषा बदलण्याचा प्रश्न आला नाही म्हणून कदाचित त्या स्त्रीच्या भाषिक धोरणाला फारसा विरोध झाला नसावा. किंवा कदाचित त्यांनाही आपल्या जैन समाजाची भाषा महत्त्वाची वाटली असावी. या भाषिक प्रश्नामध्ये स्त्रीवादीबरोबर इतरही अनेक सामाजिक कारणांचा विचार महत्त्वाचा ठरतो.

वर्षानुवर्षे महाराष्ट्रात राहिल्याने या लोकांना मराठी व गुजराती या दोन्ही भाषांबद्दल प्रेम वाटू लागते. दोघांची गुजराती मातृभाषा असणारे पतिपत्नी फक्त त्या दोघांपुरती मराठी भाषेची निवड करतात. ही निवड सहजगत्या केली जाते. एकाच वेळी दोन भाषांवर प्रभुत्व असल्यामुळे ही भाषानिवड त्यांना शक्य झाली. अशा वेळी मातृभाषेवर स्थानिक भाषाचा प्रभाव दिसून येतो आणि तो भाषिकदृष्ट्या महत्त्वाचा ठरतो.

या समाजातील प्रतिष्ठितांची मुले गेल्या १५-२० वर्षांपासून इंग्रजी माध्यमांच्या शाळांमध्ये किंवा कॉन्व्हेंटमध्ये जाणीवपूर्वक घातली जातात. या मुलांना मराठी - गुजरातीच्या बरोबरीने हिंदी व इंग्रजी भाषा सराईतपणे बोलता येतात. फक्त बोलतातच एवढे नाहीतर कुटुंबियांशी संवाद साधताना निरनिराळ्या भाषांची निवड सहजगत्या करतात. भावंडे एकाच शाळेत जात असल्याने ती एकमेकांशी हिंदीत किंवा इंग्रजीत बोलतात. शाळेत बोलली जाणारी हिंदी वा इंग्रजी भाषा त्यांना भावाबहिणींशी संवाद करायला मित्रत्वाची वाटते.

सहजगत्या दिसून आलेली ही भाषिक निरीक्षणे. स्थलांतरित झालेल्या सर्वच लोकांमध्ये अशा दोन तीन भाषा वापरल्या जात असतीलही. या लोकांना वाटणारे भाषाप्रेम प्रांतीय असते की जातीय? की पारंपरिक? भाषेचा समाजशास्त्रीय अभ्यास करताना अशा प्रश्नांना भिडावेच लागते.

मातृभाषेतील शिक्षणाने मुलाच्या बुद्धीचा स्वाभाविक विकास होतो, हे तत्त्व अशावेळी कितपत लागू पडत असेल? का या मुलांची भाषिक क्षमता अधिक चांगली होते? पण प्रत्यक्षात मात्र या मुलांना गुजराती किंवा मराठी यातील एकच भाषा लिहिण्या

वाचण्यासाठी येते. दुसरी भाषा तशी मौखिक पातळीवरच राहते. किमान भाषिक कौशल्ये ते आत्मसात करताना दिसतात. म्हणजेच आपल्या प्रांताची व जातीची भाषा म्हणूनच केवळ गुजराती भाषेचा आग्रह धरला जातो व तिचा वापर केला जातो.

जैन समाज बहुतांशी व्यापारी असतो. यांच्या मुलांचा उच्च शिक्षणाबाबतचा ओढा व्यावसायिक अभ्यासक्रमाकडेच असतो. (उदा. डॉक्टर, इंजिनियर इत्यादी) समाजशास्त्र किंवा साहित्य याकडे केवळ पदवीपुरते पाहिले जाते. दोन भाषा जन्मापासून येत असूनही ग्रंथ-भाषांतर किंवा साहित्यनिर्मिती अपवादानेच आढळते. गुजरातीमधील अभिजात साहित्याचे वाचन ही मंडळी फारसे करताना दिसत नाहीत. भाषा येत असल्यातरी साहित्यभिरुची ही असावी लागते, तरच साहित्याचा आस्वाद घेता येतो, हेच खरे. एकूणच समाजातील कलाभिरुची दुय्यम दर्जाकडे वळत असताना हाच समाज त्याला कसा अपवाद ठरणार?

❒❒

---

## संस्कृत देवांची, इंग्रजी भूदेवांची, मराठी कोणाची?

पावणे दोनशे वर्षापूर्वीची कथा, ब्रिटिश अंमल नुकताच आला होता. पेशवाईत प्रतिवर्षी पुण्यात रमणा भरवून त्यात ब्राह्मणांना लाखो रुपये दक्षिणा म्हणून वाटली जाई. (घाशीराम कोतवाल आठवतो?) त्या पैशाचा सदुपयोग करावा म्हणून नव्या राजवटीने पुण्यात संस्कृत कॉलेज काढण्याचे योजले. (त्याचेच, मला वाटते, 'न्यू कॉलेज' झाले.) पुढे टिळक, आगरकर जिथे शिकले त्या डेक्कन कॉलेजचा तो पूर्वावतार. संस्कृत कॉलेजसाठी अभ्यासक्रम आखताना संस्कृतला अर्थात् महत्त्व दिलेच. त्याशिवाय भाषा म्हणून इंग्रजी व मराठी शिकाव्यात असा संकल्प होता. पण पुण्यातील ब्रह्मवृंदाने जोरदार आक्षेप घेतला- तो मराठीला! मी स्वतःच पूर्वी कुठेतरी याविषयी म्हटले आहे की, संस्कृत देवांची भाषा, इंग्रजी भूदेवांची. मराठीचा काय अधिकार?'' अशी विचारसरणी.

**(प्रा. मं. वि. राजाध्यक्ष - भाषाविवेक, श्री विद्या प्रकाशन, पुणे १९९७ पृ. १६-१७)**

❒❒





अनुक्रमणिका

# इंग्लिशमधील कोशवाङ्मय

मिलिंद स. मालशे

इंग्लिश भाषेमधील कोशवाङ्मयाला सुमारे चारशे वर्षांची परंपरा आहे. ज्ञानकोश व शब्दकोश, त्याचप्रमाणे कोशसदृश वाङमय यांचे अनेक प्रकार इंग्लिशमध्ये उपलब्ध आहेत आणि जगाच्या कानाकोपऱ्यात ते पोहोचलेले आहेत. या दीर्घ आणि समृद्ध परंपरेचा या लेखात एक धावता आढावा घ्यायचा आहे. कोशवाङ्मयाचे स्वरूप, त्याचे प्रकार व इंग्लिशमधील कोशवाङ्मयाचे महत्वाचे ऐतिहासिक टप्पे, हे तीन पैलू ध्यानात घेऊन पुढील रूपरेषेनुसार हा आढावा घेऊः

**१. ''कोश'' या संज्ञेमागील संकल्पनाः**

१.१ कोश, dictionary, व encyclopaedia.

१.२ भाषिक व भाषेतर ज्ञान

१.३ कोश व कोशसदृश वाङ्मय

**२. इंग्लिशमधील कोशवाङ्मयः**

२.१ कोशरचनेचा प्रारंभः भाषिक आत्मभान

२.२ ज्ञानकोश

२.३ भाषिक व सांस्कृतिक संचिताचे कोशः मिथ्यके, वाक्प्रचार, म्हणी व उद्धृते

२.४ लॅरूस धर्तीचे शब्द-ज्ञान-कोश

---

(**ऋणनिर्देश** : मूळ निबंध सादर करण्याची संधी ''मराठीतील कोशवाङ्मयः वस्तुस्थिती आणि अपेक्षा'' या विषयावर श्रीमती ना. दा. ठा. महिला विद्यापीठामध्ये २८-२९ सप्टेंबर रोजी झालेल्या परिसंवादात प्रथम मिळाली (संयोजकः (१) राज्य मराठी विकास संस्था, (२) डॉ.स.गं.मालशे संशोधन केंद्र. ना.दा.ठा. विद्यापीठ, व (३) पदव्युत्तर मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ). परिसंवादाचे संयोजक आणि त्यात सहभागी झालेले अभ्यासक यांचा मी अत्यंत आभारी आहे. वेळेच्या बंधनामुळे हे सादरीकरण फार त्रोटक होते. त्यावर परिष्करण करून व त्यात बरीच भर घालून प्रस्तुत लेख सिद्ध केला आहे. कोशवाङ्मय व सूचीवाङ्मय या विषयावर राज्य मराठी विकास संस्थेतर्फे प्रकाशित होणाऱ्या आगामी ग्रंथामध्ये हा लेख समाविष्ट होईल.)





अनुक्रमणिका

**१. ''कोश'' या संज्ञेमागील संकल्पनाः**

कोश हे प्रामुख्याने दोन प्रकारचे असतात. एक ज्ञानकोश, तर दुसरा शब्दकोश. इंग्लिशमध्ये या दोन प्रकारांसाठी encyclopaedia आणि dictionary अशा दोन वेगळ्या संज्ञा आहेत आणि दोहोंना सामावून घेणारी ''कोश'' अशी व्यापक वर्गवाचक संज्ञा नाही. आपण प्रथम या संज्ञांच्या व्युत्पत्ती आणि त्यांच्या अर्थांचा विचार करू.

**१.१. कोश, dictionary व encyclopaedia**

''कोश'' या शब्दाचे आपटे यांच्या संस्कृत-इंग्लिश शब्दकोशात (१८९०) चोवीस अर्थ दिलेले आहेत. ''खजिना, साठा, संग्रह'' हा या शब्दाच्या अर्थाचा एक मूलघटक आहे. साठा किंवा संग्रह करण्यासाठी पात्र किंवा भांडे आवश्यक असते, व त्यामुळे ''कोणतेही द्रव्य धारण करणारे पात्र, भांडे, vessel, bucket, box'' असाही या शब्दाचा अर्थ होतो. ''आवरण किंवा vesture'' हा वैदिक अर्थही लक्षणीय आहेः देहामध्ये अन्न, प्राण, मन, विज्ञान व आनंदमय असे पाच कोश येतात आणि त्यांना आत्म्याची आवरणे मानले जाते. भाषेच्या संदर्भात ''कोश'' म्हणजे अर्थातच शब्दनिधी वा शब्दसंग्रह, dictionary, lexicon किंवा vocabulary. या अर्थाच्यामागेही संग्रह आणि धारण करणारे पात्र याच संकल्पना आहेत.

भारतीय परंपरेमधल्या अमरकोशामध्ये पदार्थांचे विविध वर्ग केलेले असून त्याची तीन कांडांमध्ये विभागणी केलेली आहे आणि त्या त्या वर्गातील शब्दांना समानार्थी शब्द दिलेले आहेत. शब्दकोशापेक्षा ''थिसोरस'' (thesaurus) या संकल्पनेशी तो जवळचा आहे : thesauros या ग्रीक शब्दाचा अर्थही खजिना किंवा treasure असाच आहे.

इंग्लिशमधल्या dictionary या शब्दाचे मूळ dict, dicta, dictum यांत आहे. मूळ लॅटिन धातू dicere म्हणजे ''म्हणणे, to say''; diction म्हणजे saying, म्हण किंवा word, शब्दः dictionary म्हणजे शब्दांचा आणि म्हणींचा संग्रह.

Encyclopaedia या शब्दामागे लहान मुलांना वा बालकांना (आणि पारंपरिक दृष्टीनुसार बालके नेहमी ''अज्ञ''च असतात) ज्ञान किंवा शिक्षण देण्याची संकल्पना आहेः

paedia म्हणजे ज्ञान किंवा शिक्षण; त्यातल्या pais या मूळ शब्दाचा अर्थ मूल किंवा बालक. त्याबरोबर encyclo म्हणजे विशिष्ट (वर्तुलाकृती) आकार वा घाट दिलेले काहीही. यावरून वेगवेगळ्या कला, विद्या, शास्त्रे या संपूर्ण ज्ञानवर्तुळाचे शिक्षण देणारा ग्रंथ म्हणजे encyclopaedia, असा अर्थ सिद्ध होतो (पाहाः Partridge, 1963.).

**१.२. भाषिक व भाषेतर ज्ञान**

कोश म्हणजे माहिती वा ज्ञान देणारे मुद्दाम रचलेले एक साधन, ही संकल्पना येथे ध्यानात घ्यायला हवी. कोणत्याही समाजात आत्मभान निर्माण झाल्याखेरीज कोश निर्माण होऊ शकणार नाहीत ही गोष्ट उघड आहे. समाजाच्या विविध व्यवहारांमधून एक अस्फुट स्वरूपाची ज्ञानव्यवस्था जाणवत असते. तिचे संकलन करून तिला मूर्त सुव्यक्त असे रूप देणे, हे कोशाचे काम असते. भाषा ही ज्ञान ग्रथित करण्याचे सर्वात महत्त्वाचे साधन आहे. तेव्हा समाजाच्या भाषिक व भाषेतर व्यवहारांमागे असणारे ज्ञान भाषेद्वारा टिपून त्याची विशिष्ट प्रकारे सुलभ मांडणी करून ते ज्ञान सर्वांना उपलब्ध करून देणे, हे ज्ञानकोशाचे कार्य असते. याच आत्मभानाचा एक महत्त्वाचा भाग म्हणजे भाषेविषयीचे ज्ञान होय. भाषेविषयीचे ज्ञान भाषेद्वाराच टिपून त्याची सुलभ मांडणी करून ते सर्वांना उपलब्ध करून देणे हे शब्दकोशाचे कार्य असते.

भाषिक ज्ञानाचे संकलन व मांडणी शब्दकोशामध्ये भाषेच्या द्वारेच करायची असते, हे लक्षात ठेवले पाहिजे. ही मांडणी दोन प्रकारे करता येते. एक म्हणजे शब्दांचे अर्थ अधिक ''सोप्या'', अधिक ''मूलभूत'' स्वरूपाच्या शब्दांत सांगणे. अलीकडच्या बहुतेक शब्दकोशामध्ये मूलभूत शब्दसंग्रह किंवा defining vocabulary दिलेली असते. मात्र अर्थ देण्यासाठी जो मूलभूत शब्दसंग्रह वापरला जातो त्या शब्दसंग्रहामधल्या शब्दांचा अर्थ कसा द्यायचा ही कोशकारांसमोर असणारी आपत्ती आहे, आणि तिचे संपूर्ण निराकरण होणे अशक्यच आहे. भाषेविषयीची माहिती ग्रथित करण्याचा दुसरा प्रकार म्हणजे समानार्थी तसेच विरूद्धार्थी शब्द संकलित करणे.

**१.३ कोश व कोशसदृश वाङमय**

ज्ञानाचे संकलन व मांडणी विविध प्रकारे करता येते. कोश वा encyclopaedia असे शीर्षक असणाऱ्या ग्रंथांमध्येसुद्धा अकारविल्हे मांडणी असेलच असे नाही. अमरकोशामध्ये अकारविल्हे मांडणी नाही. अलीकडे प्रसिद्ध झालेल्या डेविड क्रिस्टल यांच्या The Cambridge Encyclopedia of Language (1987) हा ग्रंथ अकरा विभागात मांडलेला असून त्यात पासष्ट उपविभाग आहेत. ही मांडणी अकारविल्हे नाही.

आधुनिक काळात निर्माण झालेल्या अनेक ज्ञान-संकलनांमध्ये अकारविल्हे व्यवस्था आढळत नाही. उदाहरणार्थ, The Joy of Knowledge ही १९८० सुमाराला प्रसिद्ध झालेली ज्ञानसंकलनाची माला पाहिली तर त्यातील माहिती ज्ञानकोशसदृश आहे परंतु मांडणी मात्र अकारविल्हे नाही. या संपूर्ण मालिकेला "The illustrated Reference

Book Series" असे म्हटलेले आहे. प्रत्येक संदर्भग्रंथात स्वतंत्र विषय हाताळलेला आहे. विषयांची यादी पाहिली तर या मालिकेत विषयविभागणीमागे फारसे सुसंगत सूत्र आढळत नाही: Science, The Universe, The Earth, Natural Resources, Plants and invertebrates, Animals, The Human Body, Man in Society, Modern Technology, Art, Ancient History, The Middle Ages, Modern History. प्रत्येक विषयाची मांडणी साधारणपणे ऐतिहासिक वा काल्पनिक स्वरूपाची आहे. अकारविल्हे सूची फक्त ग्रंथाच्या शेवटी आहे. ज्ञानाच्या मांडणीसाठी spread system किंवा विस्तारित - पृष्ठ मांडणी वापरलेली आहे. समोरासमोरची दोन पृष्ठे मिळून एक स्प्रेड तयार होते. एका उपविषयाला एक स्प्रेड दिलेले असते. ज्ञानाची मांडणी भाषिक मजकुराबरोबरच चित्रमाध्यमातूनही केलेली आहे; साधारण पन्नास टक्के मजकूर आणि पन्नास टक्के चित्रे अशी विभागणी आहे. प्रत्येक स्प्रेडच्या उजव्या कोपऱ्यावरच्या बाजूला त्या स्प्रेडची गुरुकिल्ली किंवा key असते. एक चित्र व त्याबरोबर विवेचनात्मक मजकूर असे या गुरुकिल्लीचे स्वरूप असते. Man in Society यावरील संदर्भ ग्रंथ घेतला तर त्यातील मांडणी सहा उपविषयांच्या आधारे होते: Human development, Man and his gods, Communications, Social and political organization, Work and Play, आणि Economics. या तऱ्हेच्या ज्ञानसंकल्पनांचा व्याप ज्ञानकोशासारखा असला तरी हे कोशसदृश साहित्यच म्हणायला हवे, कारण कोश म्हटल्यावर अकारविल्हे मांडणीच डोळ्यांपुढे येते.

भाषिक ज्ञानाच्या संकलनामध्येसुद्धा अकारविल्हे मांडणी असेलच असे नाही. आधी म्हटल्याप्रमाणे अमरकोशात अकारविल्हे मांडणी नाही. एकोणिसाव्या शतकात ज्ञानाचा जो प्रसार होत होता त्यातून भाषिक ज्ञान आणि संकल्पनात्मक वर्गीकरण यांची सांगड घालण्याचे प्रयत्न सुरू झाले. यातूनच लेखकांच्या लेखनप्रक्रियेमध्ये नेमका शब्द सापडण्यासाठी जो झगडा चालतो त्याला मदत म्हणून थिसोरस ही कल्पना आकाराला आली. पीटर मार्क रॉजे (१७७९-१८६९) या डॉक्टर-वैज्ञानिकाने १८५२ मध्ये आपला थिसोरस प्रसिद्ध केला त्यावेळचा त्याचा हेतू त्याच्या संपूर्ण शीर्षकातूनच व्यक्त होतो: Thesaurus of English Words and Phrases Classified and Arranged so as to Facilitate the Expression of ideas and Assist in Literary Composition. रॉजेने शब्दाच्या अर्थाची पुढील सहा अर्थक्षेत्रांमध्ये विभागणी केली. abstract relations, space, matter, intellect, volition, आणि affection. या अर्थक्षेत्रांची आणखी उपविभागणी करून त्याने एक हजार अर्थक्षेत्रे निश्चित केली आणि त्यानुसार शब्दांची व्यवस्था लावली. नंतर या अर्थक्षेत्रांच्या व्यवस्थेला अकारविल्हे शब्दसूचीची जोड देऊन थिसोरस सिद्ध केला.

रॉजेच्या हयातीमध्येच या कोशाच्या सत्तावीस आवृत्या निघाल्या. त्याचा मुलगा जॉन ल्यूडस रॉजे याने १८७९ मध्ये आणि नातू सॅम्युअल रोमिली रॉजे याने १९३३ मध्ये या

थिसोरसच्या विस्तारित आवृत्त्या प्रसिद्ध केल्या. इतर अनेक कोशकारांनीही रॉजेच्या थिसोरसच्या विस्तारित आवृत्या काढलेल्या आहेत. विसाव्या शतकामध्ये विज्ञान-तंत्रज्ञानाच्या विकासामुळे इंग्लिश भाषेमध्ये जी भर पडत राहिलेली आहे ती ध्यानात घेऊन रॉजेच्या थिसोरसच्या या सर्व विस्तारित आवृत्या निघालेल्या आहेत. उदाहरणार्थ, टॉमस वाय. क्रोवेल कंपनीने पहिली आवृत्ती १८८६ मध्ये काढली आणि पुढे सतत तिचा विस्तार होत राहिला. या प्रकाशन संस्थेने १९६२ मध्ये काढलेल्या Roget's International Thesaurus च्या तिसऱ्या आवृत्तीमधील मूळ संकल्पनात्मक व्यवस्था आठ अर्थक्षेत्रांची आहे: abstract relations, space, physics, matter, sensation, intellect, volition आणि affection. भौतिक विज्ञान व मनोविज्ञान यांच्या विकासामुळे physics आणि sensation यांची भर पडलेली आहे. (मात्र ही भर नेमकी कोणत्या आवृत्तीमध्ये पडली त्याचा उल्लेख सापडत नाही.) त्याचप्रमाणे उपवर्गीकरणासाठी मूळ एक हजार उपक्षेत्रांऐवजी एक हजार चाळीस उपक्षेत्रे निश्चित केलेली आहेत. इंग्लिशमधल्या सुमारे अडीच लाख शब्दांची व्यवस्था या आवृत्तीमध्ये लावलेली आहे.

रॉजेच्या थिसोरसची मूळ मांडणी संकल्पनात्मक आहे, अकारविल्हे नाही, ही गोष्ट खरी असली तरी इंग्लिशमधील समानार्थी शब्दांची अकारविल्हे मांडणीही अलीकडे ''थिसोरस'' या शीर्षकाखाली प्रसिद्ध झालेली आढळते. New Webster's Thesaurus ची मांडणी "Dictionary Format of Synonyms and Antonyms" या स्वरूपात करून आणि वेब्स्टरचा शब्दकोश त्याला जोडून दोन ग्रंथ एकत्र प्रसिद्ध करण्याची किमया बुक्स इसेन्शल्झ पब्लिकेशन्स या अमेरिकन प्रकाशन संस्थेने केलेली आहे. कॉलिन्झने प्रसिद्ध केलेल्या The New Collins Thesaurus आणि ऑक्सफर्डचा The Oxford Thesaurus (१९९१) यांची मांडणीही संकल्पनानिष्ठ नसून अकारविल्हे आहे. थिसोरसच्या संकल्पनेबरोबरच भाषेच्या संकल्पनात्मक नकाशाशी संबंधित असणाऱ्या word-finder आणि reverse dictionary या संकल्पनांनीही इंग्लिशमध्ये मूळ धरले आहे. संकल्पना मनात घोळत असते पण योग्य तो शब्द सापडण्यासाठी थोडी मदत हवी असते. ही मदत word-finder किंवा संकल्पनेपासून शब्दापर्यंत नेणारा उलटा शब्दकोश करू शकतो. Reader's Digest Reverse Dictionary (१९८९) या अलीकडच्या कोशामध्ये दोन विभाग आहेत. पहिल्या विभागात संकल्पनेपासून शब्दाकडे नेणारा उलटा शब्दकोश आहे, तर दुसऱ्या विभागामध्ये अवघड शब्दांची यादी दिलेली आहे.

अकारविल्हे रचना कोशाच्या रचनेमध्ये का स्वीकारली गेली असावी? याचा विचार केला तर ज्या भाषेच्या लिपीचे प्रमाणीकरण झालेले आहे त्या भाषेत अकारविल्हे अनुक्रम ही एक उत्तम सोय ठरते. हे सहज लक्षात येईल. मात्र अकारविल्हे मांडणी हे काही महत्त्वाचे बौद्धिक वा ज्ञानशास्त्रीय तत्त्व ठरू शकत नाही, हेही तेवढेच खरे. भाषिक ज्ञान किंवा भाषेतर

ज्ञान यांची मनातली साठवणी आणि व्यवस्था ही काही अकारविल्हे झालेली नसते. उदाहरणार्थ, भाषाविज्ञानाच्या दृष्टीने पाहता आपल्या मनात विकसित झालेला शब्दनिधी (mental lexicon) हा अकारविल्हे आत्मसातही झालेला नसतो किंवा त्याची व्यवस्थाही अकारविल्हे नसते. शब्दांमध्ये जे अनेक प्रकारचे अर्थात्मक संबंध (semantic relations) असतात त्यांच्या आधारे या प्रक्रिया घडत असतात. मात्र वर म्हटल्याप्रमाणे ज्या समाजामध्ये भाषेची लिखित व्यवस्था लिपीच्या आधारे प्रमाणित झालेली असते आणि औपचारिक शिक्षणाची व्यवस्था विकसित झालेली असते त्या समाजात अकारविल्हे रचलेले कोश अध्ययन-अध्यापनाच्या प्रक्रियेत फार सोयीचे ठरतात.

**२. इंग्लिशमधील कोशवाङ्मय :**

**२.१. कोशरचनेचा प्रारंभ : भाषिक आत्मभान**

वर मांडलेल्या मुद्द्यांचा प्रत्यय आपल्याला इंग्लिश भाषेच्या संदर्भात येतो. मध्ययुगीन कालखंडात लॅटिन भाषेतील शब्दांना इंग्लिश पर्याय देणारे कोश निर्माण झालेले होते. उदाहरणार्थ, पंधराव्या शतकामध्ये तयार झालेला Promptorium Parvulorum हा कोश या स्वरूपाचा होता. रेनेसान्स काळात, म्हणजे सोळाव्या शतकामध्ये युरोपीय समाजांमध्ये एक भाषिक व साहित्यिक आत्मभान निर्माण झाले असे मानले जाते.

या आत्मभानामध्ये ज्ञानाची भूक अंतर्भूत होतीच, शिवाय तिला भाषिक अस्मितेची जोड मिळालेली होती. या आत्मभानाचे दोन महत्त्वाचे आविष्कार म्हणजे ज्ञानकोश आणि शब्दकोश होत. लॅटिन या अभिजात भाषेत उपलब्ध असणाऱ्या ज्ञानाला इंग्लिशसारख्या ''देशी'' वा vernacular भाषेत उपलब्ध करून देण्यामागे ज्ञानाची भूक तर होतीच; शिवाय भाषिक अस्मितेचा भागही त्यात होता. यातूनच सतराव्या शतकातील इंग्लिश ज्ञानकोश निर्माण झाले.

इंग्लिश समाजाच्या आत्मभानाचा दुसरा पैलू भाषिक स्वरूपाचा होता. बहुजन समाजाची अनौपचारिक व्यवहाराची बोली-भाषा एका बाजूला, तर ''इंकहॉर्न'' (inkhorn) स्वरूपाची पंडिती, लॅटिन- प्रचुर, आलंकारिक व साहित्यिक वळणाची, औपचारिक, अवघड अशी लिखित- भाषा दुसऱ्या बाजूला, अशा भाषेच्या दोन भेदाची स्पष्ट जाणीव इंग्लिश समाजामध्ये सोळाव्या शतकात निर्माण झाली. ही जाणीव निर्माण झाल्यावर या दोन भाषाभेदांचे परस्पर संबंध तपासायला अभ्यासकांनी सुरुवात केली आणि या अभ्यासातूनच शब्दकोशांची रचना होऊ लागली. अवघड शब्दांच्या याद्या बनवून त्यांचे अर्थ सोप्या शब्दांत देणे, त्याचप्रमाणे सोप्या शब्दांना अवघड पर्याय देणे, अशा दोन्ही प्रकारच्या अकारविल्हे कोशरचना सतराव्या शतकात झाल्या. १६०४ मध्ये रॉबर्ट कौडी याने सुमारे अडीच हजार कठीण इंग्लिश शब्द अकारविल्हे मांडून त्यांचे अर्थ देऊन इंग्लिशमधील पहिला शब्दकोश रचला असे मानले जाते. या कोशाचे संपूर्ण शीर्षक पुढील प्रमाणे आहे: A Table Alphabeticall Contyning and Teaching the True

Writing and Understanding of Hard Usuall English Wordes. हेन्री कॉकरॅम याच्या English Dictionarie (१६२३) या कोशात कठीण शब्दांना सोपे पर्याय आणि सोप्या शब्दांना कठीण पर्याय, अशा दोन्ही प्रकारच्या याद्या आहेत. या प्रकारच्या कोशरचनेबरोबरच शब्दांच्या व्युत्पत्तीचाही अभ्यास सुरू झाला आणि त्याचाही अंतर्भाव कोशरचनेमध्ये होऊ लागला. या अभ्यासामधून नथॅनिअल बेली याचा Universal Etymological English Dictionary (१७२१) हा महत्त्वाचा शब्दकोश निर्माण झाला.

**२.२. ज्ञानकोश**

ज्ञानकोशरचनेच्या बाबतीत सतराव्या अठराव्या शतकांमध्ये फ्रांसने आघाडी मारलेली होती. या काळात फ्रेंच भाषेत अनेक ज्ञानकोश रचले गेले. दिदेरो याच्या संपादनाखाली सिद्ध झालेला L' Encyclopedia (१७५१ - १७७६) हा पस्तीस खंडांचा ज्ञानकोश म्हणजे प्रबोधनाने गाठलेले एक अत्युच्च ज्ञानशिखर मानले जाते. ज्या काळात उपलब्ध असणाऱ्या मानवी ज्ञानाचे अत्यंत व्यापक संकलन आणि बुद्धिप्रामाण्यवादी स्पष्टीकरण, या दोन वैशिष्ट्यांमुळे त्याला असाधारण महत्त्व प्राप्त झाले. बुद्धिप्रामाण्य हा मूलभूत निकष मानल्याने तत्कालीन अंधश्रद्धांवर त्यात हल्ला असणे साहजिकच होते. तसेच सर्वसामान्य वाचकाला ज्ञान उपलब्ध करून दिल्याने चर्च आणि सरंजामशाही शासन या दोहोंचाही रोष या ज्ञानकोशाने ओढवून घेतलेला होता.

इंग्लिशमधला ज्ञानकोशरचनेचे प्रमुख प्रयत्न स्कॉटलंडमध्ये झालेले आढळतात. अठराव्या शतकात प्रथम प्रसिद्ध झालेला Encyclopaedia Britannica आणि एकोणिसाव्या शतकात रॉबर्ट चेंबर्झ या स्कॉटिश विद्वानाने १८५९ ते १८६८ या काळात एडिंबरा येथे प्रसिद्ध केलेला Chamber's Encyclopaedia हे दोन्ही प्रयत्न स्कॉटलंडमध्येच झाले. (तेथील एडिंबरा विद्यापीठ १५८३ मध्ये स्थापन झालेले होते आणि ऑक्सफर्ड व केंब्रिज विद्यापीठाच्या बरोबरीने या विद्यापीठाचेही नाव घेतले जाते, हे येथे लक्षात घेण्यासारखे आहे.)

Encyclopaedia Britannica ची पहिली आवृत्ती १७६८ ते १७७१ या कालखंडात स्कॉटलंडमध्ये प्रसिद्ध झाली. या प्रारंभीच्या आवृत्तीमध्ये कला आणि विज्ञान यांच्याविषयीचे ज्ञान तीन खंडांमध्ये ग्रथित केलेले आहे. त्याची दुसरी आवृत्ती लगेचच म्हणजे १७७७ ते १७८४ या कालखंडात निघाली आणि तिच्यात इतिहास आणि चरित्रे यांची भर घातलेली होती. १९०१ मध्ये होरस हूपर या अमेरिकन प्रकाशकाने या कोशाचे हक्क विकत घेतले आणि १९४३ पासून शिकागो विद्यापीठाने या ज्ञानकोशाला अधिकाधिक व्यापक स्वरुप देण्याचे कार्य चालू ठेवलेले आहे. The New Encyclopaedia Britannica या १९७५ च्या पंधराव्या आवृत्तीमध्ये मूळ संकल्पनेमध्ये क्रांतिकारी बदल करण्यात आले. मूळ संकल्पनेमध्ये असणारी व्यापक ज्ञान व माहितीची बाजू तर हवीच,

परंतु त्याच बरोबर शैक्षणिक दृष्टीने सखोल ज्ञान देणारा ग्रंथ म्हणूनही या कोशाचा उपयोग व्हावा असे संपादकांना वाटले. त्या दृष्टीने या आवृत्तीमध्ये या ज्ञानकोशाचे तीन भाग करण्यात आले. व्यापक ज्ञान व माहिती नोंदविण्यासाठी दहा खंडांचा Micropaedia प्रसिद्ध करण्यात आला. हा आधीच्या ज्ञानकोश-कल्पनेचाच भाग होता. परंतु सखोल आणि विस्तृत ज्ञानाची शैक्षणिक गरज भागविण्यासाठी एकोणीस खंडांचा Macropaedia ही सिद्ध करण्यात आला, व त्याचबरोबर एकूण ज्ञानक्षेत्रांची रूपरेषा व Micropaedia व Macropaedia या दोहोंमध्ये आलेल्या नोंदीची रूपरेषा देणारा Propaedia हा प्रास्ताविक खंडही सिद्ध करण्यात आला. अमेरिकन आणि ब्रिटिश कोश परंपरांना एकत्र आणणारा हा ज्ञानकोश जगातला सर्वश्रेष्ठ ज्ञानकोश मानला जातो. अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष आणि इंग्लंडची राणी दुसरी एलिझाबेथ या दोघांना हा ज्ञानकोश अर्पण केलेला आहे, ही गोष्टही उल्लेखनीय आहे.

The Encyclopedia Americana हा ज्ञानकोश म्हणजे अर्थातच Britannica चा अमेरिकन प्रतिस्पर्धीच होता. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी तीस खंडांच्या या अमेरिकन ज्ञानकोशाचा पहिला खंड १८२९ मध्ये प्रसिद्ध झाला. अमेरिकन समाज व संस्कृती, राजकीय घडामोडी, इतिहास, साहित्य इत्यादींसाठी हा ज्ञानकोश उपयुक्त आहे, हे खरे. परंतु ब्रिटानिकाचे हक्क १९०१ पासून अमेरिकेतच असल्यामुळे आणि ब्रिटानिकापेक्षा फारसा वेगळा ठसा न उमटल्याने या ज्ञानकोशाचा प्रसार फारसा झालेला नाही.

विशिष्ट विषयांना वाहिलेले ज्ञानकोश या दुसऱ्या प्रकारातही इंग्लिशमध्ये फार मोठ्या प्रमाणावर कार्य झालेले आहे. नैसर्गिक विज्ञाने, गणित, सामाजिक विज्ञाने, मानव्यविद्या, कला या प्रकारच्या ज्ञानाच्या विशिष्ट शाखा तसेच या सर्व विषयांच्या उपशाखा यांतील अद्ययावत माहितीचे संकलन करणारे शेकडो कोश इंग्लिशमध्ये सतत रचले गेलेले आहेत. मानवी मूल्यव्यवहार, धर्म, नीती, तत्त्वज्ञान यांसंबंधीच्या संकल्पना स्पष्ट करणारा Encyclopaedia of Religion and Ethics (1908) हा बारा खंडांचा (शिवाय तेरावा सूची खंड) प्रचंड ज्ञानकोश जेम्झ हेस्टिंग्झ यांच्या संपादनाखाली या शतकाच्या प्रारंभी प्रसिद्ध झाला. धर्मशास्त्र व तत्त्वज्ञान, मानवशास्त्र, मिथ्यक परंपरा, लोक परंपरा, जीवविज्ञान, मनोविज्ञान, अर्थशास्त्र आणि समाजविज्ञान, या मानव्यविद्या आणि सामाजिक विज्ञानांचा संदर्भ या कोशाला मिळालेला आहे. विज्ञान आणि तंत्रज्ञान या विषयांच्या विचार केला तर McGraw-Hill Encyclopedia of Science and Technology (प्र.आ. १९६०) या ज्ञानकोशाचा उल्लेख करावा लागेल. या ज्ञानकोशाची सातवी आवृत्ती १९९२ मध्ये प्रसिद्ध झाली. ती वीस खंडांची असून साडेसात हजार नोंदी आणि सुमारे तेरा हजार चित्रे व आकृत्या या कोशात समाविष्ट केलेल्या आहेत. या आवृत्तीच्या एकूण तीन हजार तज्ज्ञ नोंदलेखकांपैकी एकवीस लेखक नोबल-लॉरियट आहेत! कोशाच्या शेवटी एक

लाख साठ हजार संज्ञांची विश्लेषणात्मक सूची (Analytical index) आहे. तसेच विशिष्ट ज्ञानक्षेत्रातील उपविषयांवरील नोंदी दर्शविणारी विषयसूची (Topical index) आहे. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसने प्रसिद्ध केलेले वेगवेगळ्या विषयांचे बृहत्-स्वरूपाचे Companions, तसेच Concise Companions च्या स्वरूपात निघालेल्या त्यांच्या संक्षिप्त आवृत्या, पेंग्विन प्रकाशनाच्या विविध विषय व उपविषयांवरील छोटेखानी Dictionaries (म्हणजे लहान आकाराचे ज्ञानकोशच?) यांनी विशिष्ट विषयांना वाहिलेल्या ज्ञानकोशांच्या क्षेत्रात महत्त्वाचे कार्य बजावलेले आहे.

**२.३. भाषिक व सांस्कृतिक संचिताचे कोशः मिथ्यके, वाक्प्रचार, म्हणी व उद्धृते :**

ज्ञानकोश व शब्दकोश या संकल्पनांसाठी वेगवेगळ्या संज्ञा इंग्लिशमध्ये असल्या तरी अनेकदा ''कोश'' या समोवेशक संकल्पनेसाठी dictionary हीच संज्ञा वापरली जाते. भाषेचे ज्ञान केवळ शब्दांच्या अर्थापुरते व व्याकरणिक कोटींपुरते मर्यादित न ठेवता भाषेला सांस्कृतिक ज्ञानाचे माध्यम मानल्यावर कोशाकडे पाहण्याचा एक वेगळा दृष्टिकोन तयार होतो. भाषेमधील वाक्प्रचार आणि मिथ्यके यांवर लक्ष केंद्रित करून त्यातून एक सांस्कृतिक ज्ञानकोश घडविणारे इंग्लिशमधील एक महत्त्वाचे उदाहरण म्हणजे रेवरंड बूअर (१८१०-१८९७) यांच्या A Dictionary of Phrase and Fable (1870) या कोशाचे आहे. मांडणीच्या दृष्टीने पाहता याची रचना अकारविल्हे आहे आणि जुन्या तसेच अर्वाचीन ग्रंथांमधून अनेक उद्धृते दिलेली आहेत. विषयक्षेत्रांच्या दृष्टीने विचार करता या कोशात इतिहास, पुरातनवस्तुशास्त्र, विज्ञान, कला, धर्म व श्रद्धा, चाली-रीती व संकेत या सर्वच क्षेत्रांमधल्या संज्ञा आणि घटना यांची संक्षिप्तपणे नोंद घेतलेली आहे; मिथ्यकला, लोकसाहित्य आणि अभिजन साहित्य यांमधील प्रमुख पात्रांवर नोंदी आहेत. इंग्लिशमध्ये इतर भाषा व संस्कृतींमधून आलेल्या महत्त्वाच्या मिथ्यकांची नोंदही यात आहेः उदाहरणार्थ, ''युग'' या प्राचीन भारतीय/ हिंदू संकल्पनेची माहिती यात मिळते. भाषेच्या अंगाने विचार करता इंग्लिशमध्ये सर्वसामान्य वापरात असणाऱ्या वाक्प्रचारांची व त्यांच्या व्युत्पत्तीविषयीच्या नोंदी यात आहेत, इतकेच नव्हे तर प्राचीन सांकेतिक भाषा (cant) व शिष्टसंमत नसणारी बोलभाषा (slang) यांचीही माहिती या कोशात मिळते. या कोशातील "A" या अक्षरावरील नोंद पुढे दिली आहे. तिच्यावरून या कोशाच्या व्यापकतेची आणि संक्षिप्तपणे परंतु नेमकेपणे ज्ञानसंकलन करण्याच्या उत्कृष्ट पद्धतीची कल्पना सहज येईलः

A. The form of this letter is modified from the Egyptian hieroglyph which represents the eagle. The Phoenician (Hebrew) symbol was 8 (aleph = an ox,) which has been thought, probably erroneously, to represent an ox-head in outline. The Greek A (alpha) was a symbol of a bad augury in the sacrifices.

A in logic denotes a universal affirmative. A asserts, E denies.

Thus, syllogisms in bArbArA (q.v.) contain three universal affirmative propositions.

बूअर यांनी १८९४ मध्ये या कोशाची दुसरी आवृत्ती काढल्यानंतर विसाव्या शतकामध्ये या कोशाच्या आणखी बारा आवृत्या निघालेल्या आहेत. १९८९ मध्ये प्रसिद्ध झालेली चौदावी आवृत्ती आयव्हर एच. इव्हन्झ यांनी संपादित केलेली आहे.

भाषिक व सांस्कृतिक ज्ञानाचे एकत्रितपणे संकलन करणारा आणखी एक प्रकार म्हणजे म्हणींचे स्पष्टीकरण देणारे कोश. इंग्लिशमधल्या सुमारे आठशे प्रचलित म्हणींचा एक अत्यंत लोकप्रिय कोश म्हणजे रिडाउट आणि विटिंग यांनी तयार केलेला English Proverbs Explained (१९६७) हा कोश होय. यात म्हणींचे मूळ दिलेले आहे, त्याचप्रमाणे इतर भाषांतून इंग्लिशमध्ये आलेल्या म्हणींचाही वेध घेतलेला आहे. बायबलमधून आलेल्या हिब्रू म्हणी त्याचप्रमाणे जनसाहित्यातून व अभिजात साहित्यातून चालत आलेल्या म्हणींची नोंद यात घेतलेली आहे.

कोणत्याही प्रगल्भ साहित्यव्यवहारामध्ये अनेक प्रकारची वचने व उद्धृते सतत वापरली जात असतात. इंग्लिशमध्ये बायबल, शेक्सपिअर, मिल्टन, बॉझवेलचे डॉ. जॉन्सनचे चरित्र, वर्डस्वर्थ, कीट्स, वाइल्ड, शॉ यांसारख्या ग्रंथांनी व लेखकांनी वाचकांच्या मनाची जबरदस्त पकड घेतलेली आहे आणि त्यांची वचने हा भाषिक व साहित्यिक संचिताचा बहुमोल भाग मानला जातो. काही वेळा आपल्या मनात एखादेच वाक्य किंवा वाक्याचा एखादाच अंश रुतून बसलेला असतो. कीट्स् या कवीने "a thing of beauty". किंवा " beauty and truth" याविषयी काहीतरी म्हटलेले आहे, एवढेच काही वेळा लक्षात असते. कीट्स याने लिहिलेल्या कविता डोळ्याखालून घालून तो शोध घेणे शक्य असते व ते आनंददायीसुद्धा ठरू शकते. परंतु तेवढे करूनही संदर्भ मिळाला नाही तर ते तापदायक ठरते. तेव्हा, छोट्याशा वाक्यांशावरून संपूर्ण उद्धृत मिळू शकण्याची साय उद्धृतांच्या कोशामुळे होते. वाचनाचा व उद्धृतांचा नेमका मूलस्रोत नोंदवून ठेवणे व त्याच्या आजूबाजूचा संदर्भही नोंदवणे हे काम उद्धृतांच्या कोशामुळे साधले जाते. एखादे वचन वा उद्धृत सापडणे याबरोबरच त्याच विषयावरची (उदा. beauty किंवा truth) इतर उद्धृतेही या कोशामुळे सहज हाती लागू शकतात. मात्र त्यासाठी या कोशांची रचना विशिष्ट प्रकारची असावी लागते. लेखकांची नावे अकारविल्हे लावलेली असतात; प्रत्येक लेखकाच्या वाङमयकृतींची नावे अकारविल्हे लावलेली असतात; एखाद्या वाङ्मयकृतीमधील उद्धृते एकापेक्षा अधिक असतील तर ती ज्या क्रमाने वाङ्मय कृतीमध्ये येतात तोच क्रम कायम ठेवून चरणांचे क्रमांक (प्रमाण आवृत्तींमधून) दिले जातात. प्रत्यक्ष उद्धृतांबरोबरच या कोशांचा अत्यंत महत्त्वाचा भाग म्हणजे अकारविल्हे दिलेली विषयसूची. या विषयसूचीने कोशाचा सुमारे चाळीस ते पन्नास टक्के भाग व्यापलेला असतो. या सूचीवरून एखाद्या शब्दावरून वा वाक्यांशावरून अनेक लेखकांच्या वचनांचा वा उद्धृतांचा शोध घेता येतो.

The Oxford Dictionary of Quotations हा उद्धृतांचा कोश १९४१ मध्ये प्रसिद्ध झाला. पेंग्विन प्रकाशनानेही The Penguin Dictionary of Quotations (1960), आणि The Penguin Dictionary of Modern Quotations यांसारखे उपयुक्त कोश प्रसिद्ध केलेले आहेत.

रेनेसन्स काळापासून इंग्लिश भाषेचा आधुनिक अवतार सुरू झालेला असला तरी भाषा सतत बदलत असल्याने सोळाव्या - सतराव्या शतकातील लेखकांनी वापरलेली भाषा समजायला आधुनिक वाचकाला अनेक ठिकाणी मदत घ्यावी लागते. अशी मदत करणारे विशिष्ट लेखकावर लक्ष केंद्रित करणारे कोश इंग्लिशमध्ये glossary च्या रूपात आहेत. सुप्रसिद्ध ऑक्सफर्ड शब्दकोशाच्या संपादकांपैकी एक सी. टी. अन्यन्झ यांनी तयार केलेला A Shakespeare Glossary (१९१९: दु. आ; १९८६: ति. आ.) हा कोश हे याचे उत्तम उदाहरण आहे.

**२.४. लॅरूस धर्तीचे शब्द - ज्ञानकोश**

शब्दकोशामध्येच भाषेतर माहिती व ज्ञान यांची नोंद करून शब्दकोश आणि ज्ञानकोश यांची एकत्र सांगड घालण्याची परंपरा एकोणिसाव्या शतकामध्ये फ्रान्समध्ये निर्माण झाली. या प्रकारच्या कोशांना लॅरूस-धर्तीचे कोश म्हणतात. Larousse (१८१७-१८७५) हा फ्रांसमधला प्रसिद्ध कोशकार आणि व्याकरणकार होता. १८५२ मध्ये त्याने आपली प्रकाशन संस्था काढून एकोणिसाव्या शतकातला एक प्रचंड शब्द- ज्ञान-कोश १८६६ मध्ये सिद्ध केला. इंग्लिशमध्ये या धर्तीचे प्रयत्न फार तुरळक झालेले आहेत. ओवेन वॉटसन यांनी संपादित केलेला Longman's English Larousse हा कोश प्रथम १९६८मध्ये प्रसिद्ध झाला, परंतु ही कल्पना इंग्लिशमध्ये अपरिचित होती व तिने फारसे मूळही धरले नाही. त्यामुळे त्याच्या पुढच्या आवृत्तीचे शीर्षक बदलून Longman Modern English Dictionary (१९७६) असे करावे लागले. लाँगमन प्रकाशनाच्या या पहिल्या प्रयत्नानंतर रँडम हाउ आणि रीडर्स डायजेस्ट या प्रकाशनांचे या प्रकारचे कोश थोडेसे अधिक लोकप्रिय झालेले आहेत.

**२.५. इंग्लिशमधील शब्दकोशः**

इंग्लिश भाषेत निर्माण झालेल्या शब्दकोशांचा व्याप इतका प्रचंड आहे की त्याची थोडक्यात ओळख करून देणे हे काम अवघड आहे. इंग्लंड आणि अमेरिका या दोन्ही देशांमध्ये शब्दकोशनिर्मिती फार मोठ्या प्रमाणावर झालेली आहे. येथे आपण कोशरचनेच्या तत्त्वांच्या दृष्टीने काही नवीन भर घालणाऱ्या टप्प्यांचा विचार करू.

**२.५.१ डॉ. जॉन्सनचा शब्दकोश.**

इंग्लिशमधील पहिला शब्दकोश १६०४ मध्ये रॉबर्ट कौडी याने रचला हे आपण पाहिले. प्रारंभीचे हे कोश कठीण व सोपे शब्द एकमेकांना पर्याय म्हणून देण्याचा प्रयत्न करणारे होते. अठराव्या शतकामध्ये डॉ. सॅम्युअल जॉन्सन याने इंग्लिशमधील

शब्दकोशरचनेला एक निश्चित दिशा दिली. केवळ कठीण शब्दांचे अर्थ सांगण्याऐवजी भाषेचा संपूर्ण शब्दसंग्रह ग्रथित करण्यावर डॉ. जॉन्सनचा भर होता. १७५५मध्ये प्रसिद्ध झालेल्या या द्विखंडात्मक शब्दकोशामध्ये चाळीस हजारांहून अधिक शब्दांचे अर्थ दिलेले आहेत. या कोशाचे संपूर्ण शीर्षक पाहिल्यास त्याच्या व्याप्तीची कल्पना येते: A Dictionary of the English Language in which the Words are deduced from their Originals and illustrated in their Different Significations by Examples from the best Writers to which are Prefixed A History of the Language and An English Grammar. व्युत्पत्ती आणि श्रेष्ठ लेखकांनी केलेल्या वापराची उदाहरणे ही या शब्दकोशाची महत्त्वाची वैशिष्ट्ये होती. साधारण १५६० ते १६६० या एका शतकाच्या कालखंडात इंग्लिश भाषा लेखकांनी प्रत्यक्ष कशी वापरलेली आहे याची एक लाखाच्या वर (१,१४,०००) उदाहरणे डॉ. जॉन्सनने उद्धृत केली आणि त्यांच्या आधारे अर्थनिश्चिती करण्यावर भर दिला. ही उद्धृते अर्थातच प्रामुख्याने बायबल, शेक्सपिअर, ड्रायडन, मिल्टन, एडिसन, बेकन, पोप यांतून घेतलेली होती.

काही वेळा कोशरचनेला अभिप्रेत असणारी वस्तुनिष्ठता डावलून डॉ. जॉन्सन स्वतःच्या व्यक्तिमत्वाचा ठसा उमटू पाहतो हे खरे. उदाहरणार्थ, त्याने दिलेल्या पुढील व्याख्या पाहा:

lexicographer : a writer of dictionaries; a harmless drudge...;

oats : a grain which in England is generally given to horses, but in Scotland supports the people;

Whig : the name of a faction...;

Tory : one who adhered to the ancient constitution of the state and the apostolical hierarchy of the Church of England, opposed to a Whig.

एका विशिष्ट प्रकारच्या भाषिक अस्मितेमधून हा शब्दकोश निर्माण झालेला होता. आपल्या भाषेचे आयुष्य वाढवायचे तर त्यासाठी प्रथम उच्चार निश्चित केले पाहिजेत, ती भाषा सुलभतेने उपलब्ध करून दिली पाहिजे, तिचे स्वरूप विशुद्ध राखले पाहिजे, अशी डॉ. जॉन्सनची धारणा होती. इंग्लिश भाषेचे प्रमाणीकरण करणे हे उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवूनच डॉ. जॉन्सनने हा कोश रचला यात काहीच शंका नाही: "a dictionary by which the pronunciation of our language may be fixed, and its attainment facilitated, by which its purity may be preserved, its uses ascertained, and its duration lengthened."

आधुनिक भाषाविज्ञानाला कोशरचनेची ही भावनात्मक, शुद्धीकरणात्मक आणि आदेशात्मक उद्दिष्टे आज मान्य होणारी नाहीत. शब्दकोशांमुळे भाषेचे प्रमाणीकरण अप्रत्यक्षपणे होणारच हे जरी खरे असले तरी कोशरचना ही वस्तुनिष्ठ आणि वर्णनात्मक असायला हवी, हा भाषाविज्ञानाचा आग्रहही योग्यच आहे. परंतु भाषिक आत्मभानाच्या

प्रारंभिक टप्प्यावर असताना या प्रकारची उद्दिष्टे व्यासंगाला आणि ज्ञानार्जनाला उपकारक ठरू शकतात, हेही ध्यानात ठेवले पाहिजे. अमेरिकन इंग्लिशच्या कोशांबाबतही नेमके हेच घडले.

**२.५.२. अमेरिकन इंग्लिशचे कोश**

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धामध्ये अमेरिकेमध्ये ब्रिटिश सत्तेविरूद्ध लढा सुरू झाला आणि ब्रिटिशांपेक्षा आपण वेगळे आहोत या जाणिवेचा जन्म झाला. यालाच अमेरिकन आत्मभान असे म्हणता येईल. नोह वेब्स्टर (१७५८-१८४३) आणि जोसफ इमर्सन वूस्टर (१७८४- १८६५) या अमेरिकन भाषाकोविदांमध्ये एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी जो वाद झाला त्याचा उल्लेख येथे करायला हवा. वेब्स्टर यांचा भर अमेरिकेमध्ये इंग्लिशचे रूप कसे बदललेले आहे हे सिद्ध करण्यावर होता. विशेषतः अमेरिकन इंग्लिशमध्ये स्पेलिंगचा जो वेगळेपणा आहे त्याचे प्रमाणीकरण वेब्स्टरच्या प्रयत्नामुळेच झाले. अमेरिकन इंग्लिशचा सवता सुभा थाटण्याच्या या तऱ्हेच्या प्रयत्नांना वूस्टरच्या विरोध होता. डॉ. जॉन्सन आणि स्वतः वेब्स्टर यांच्या शब्दकोशांना रिचविणारा Comprehensive Pronouncing and Explanatory Dictionary of the English Language (1830) हा शब्दकोश वूस्टरने रचला. उच्चार आणि स्पेलिंग या दोहोंच्या बाबतीत ब्रिटिश परंपरेचे पालन करण्याचा त्याचा आग्रह हार्वर्ड आणि व्हर्जिनिया या विद्यापीठांमध्ये त्यावेळी मान्य झाला असला तरी इतर सर्वत्र वेब्स्टरचाच प्रभाव होता. वेब्स्टरने सुमारे अडतीस हजार शब्दांवर नोंदी देत An American Dictionary of the English Language हा आपला द्विखंडात्मक शब्दकोश प्रथम १८२८ मध्ये प्रसिद्ध केला. या अडतीस हजारांपैकी सुमारे पाच हजार शब्द त्यापूर्वीच्या इंग्लिश कोशांमधून नोंदलेच गेलेले नव्हते. अमेरिका आणि इंग्लिश या दोन्ही देशांमधील लेखकांचे संदर्भ देत अमेरिकन इंग्लिशचा वेगळपणा सिद्ध करीत वेब्स्टरने ही कोशरचना केली. यापुढच्या आवृत्तीमध्ये (१८४०) या शब्दकोशाचा व्याप सत्तर हजार नोंदीवर गेला आणि इंग्लिश भाषेतील कोशरचनेमधला एक महत्त्वाचा टप्पा म्हणून वेब्स्टरचा शब्दकोश गणला जाऊ लागला. १९६१ मध्ये वेब्स्टरच्या कोशाची जी अलीकडची आवृत्ती Third New international Dictionary या नावाने प्रसिद्ध झाली तिच्यामध्ये साडे चार लाख शब्द ग्रथित केलेले आहेत.

**२.५.३. ऑक्सफर्ड इंग्लिश डिक्शनरी ऊर्फ OED**

जगप्रसिद्ध ऑक्सफर्ड इंग्लिश शब्दकोश हा प्रथम १८८४-१९२८ या चौवेचाळीस वर्षांच्या कालखंडात दहा खंडांमध्ये प्रसिद्ध झाला. त्याचे मूळ नाव New English Dictionary on Historical Principles असे होते. भाषिक संशोधनासाठी स्थापन झालेल्या ''दि फिललॉजिकल सोसायटी'' या संस्थेच्या सदस्यांनी १८५७ मध्ये इंग्लिश भाषेच्या शब्दकोशाची कल्पना मांडली. प्रथम हर्बर्ट कोलरिज (१८३०-६१) व नंतर

फर्निल (१८२५-१९१०) हे प्रारंभीचे संपादक होते, व त्यांनी प्राराभक सामग्री जमविण्याचे काम केले. परंतु जेम्झ मरी याने १८७८ मध्ये कोशाच्या कल्पनेला मूर्त स्वरूप द्यायला प्रारंभ केला आणि १८७९मध्ये त्याची संपादक म्हणून नेमणूक झाली.

जेम्झ मरी याचा जन्म स्कॉटलंडमधील एका शिंपी कुटुंबात झालेला होता आणि त्याचे शालेय शिक्षणही पूर्ण होऊ शकले नव्हते. त्यावेळी प्रचलित असणाऱ्या भाषिक अभ्यासाला Philology किंवा वाङ्मयविद्या म्हणत. या विद्येचे पद्धतशीर शिक्षण त्याला मिळालेले नसूनही स्वतःच अभ्यास करून त्याने भाषिक अभ्यासामध्ये आणि विशेषतः कोशविद्येत गती प्राप्त करून घेतली. ''फिललॉजिकल सोसायटी''चा तो सदस्य झाला आणि याच संस्थेच्या इतर सदस्यांच्या सहकार्याने त्याने शब्दकोशाचे संपादन केले. या बृहत्-शब्दकोशाची प्रत्यक्षातील संपूर्ण आखणी मरीने स्वतः केलेली होती आणि अर्ध्यापेक्षा अधिक संपादन त्याने एकट्यानेच केले. मात्र संपूर्ण कोश प्रसिद्ध होण्याआधीच त्याचे १९१५ मध्ये निधन झाले. त्याच्या निधनाच्या वेळी शब्दकोशाचे प्रकाशन ''टी'' या अक्षरापर्यंत पोहोचलेले होते. एच्.ब्रॅडली, डब्ल्यू, ए. केगी आणि सी.टी आन्यन्झ यांनी सह- संपादक म्हणून काम पाहिले.

इंग्लिश भाषेच्या ऐतिहासिक विकासाचे तीन प्रमुख टप्पे मानले जातात. अँग्लो-सॅक्सन वा ओल्ड इंग्लिश हा टप्पा साधारण इ.स.९०० ते ११५०, मिड्ल इंग्लिशचा टप्पा ११५० ते १५००, तर सोळाव्या शतकातील रेनेसान्सपासून आधुनिक इंग्लिशचा टप्पा सुरू होतो. जेम्झ मरीने संपादिलेल्या या कोशात आधुनिक इंग्लिशमधील जवळ जवळ चार लाख पंधरा हजार शब्दांवर नोंदी होत्या व प्रत्येक नोंदीतील तपशील ऐतिहासिक तत्त्वांच्या आधारे मांडलेला होता. प्रत्येक शब्दाची व्युत्पत्ती देणे आणि त्याचा उच्चार, रूपे आणि अर्थ यांच्यात ऐतिहासिक दृष्ट्या कसा बदल होत गेला याचा वेध घेणे, हे प्रचंड काम या कोशाने केले. त्यासाठी १२०० ते १९२८ या सुमारे सातशे वर्षांच्या कालखंडातील प्रमुख लेखकांच्या वाङमयकृतींमधून सुमारे अठरा ते एकोणीस लाख उद्धृते संकलित करून या शब्दकोशात मांडलेली आहेत. जगातल्या इतर कोणत्याही भाषेच्या संदर्भात या प्रकारचे काम इतक्या व्यापक प्रमाणात झालेले नाही. १९३३ मध्ये हे संपूर्ण काम The Oxford English Dictionary या नावाने आठशे शहात्तर पृष्ठांच्या पुरवणीसह प्रसिद्ध झाले. त्यानंतर सुमारे एक लाख वीस हजार शब्दांवर नोंदी देणारे पुरवणीचे चार खंड १९७२ ते १९८६ या काळात प्रसिद्ध झाले. १९८४ ते १९८९ या काळात The New Oxford English Dictionary Project हा प्रकल्प संगणकाच्या आधारे चालू होता. त्यातून एकवीस खंडांची OED ची जी नवी आवृत्ती १९९१ मध्ये प्रसिद्ध झाली ती व्यापकतेच्या आणि सूक्ष्मतेच्या दृष्टीने केवळ अजोड आहे.

मात्र एवढा प्रचंड आवाक्याचा कोश सर्वसामान्य वापरासाठी उपलब्ध होणे शक्य नव्हते. त्यासाठी सर्वसामान्य वापरामध्ये असणाऱ्या शब्दांवर लक्ष्य केंद्रित करणारी

सुटसुटीत व संक्षिप्त आवृत्ती आवश्यक होते. खरे म्हणजे ऑक्सफर्डचा वर उल्लेखिलेला बृहत्-कोश फारच थोड्या लोकांना माहीत असतो. सर्वसामान्य सुशिक्षितांना माहिती असतो तो ऑक्सफर्डचा कोश म्हणजे फाउलर बंधुद्वयाने तयार केलेला The Concise Oxford Dictionary of Current English हा कोश. ऑक्सफर्डचा हा शब्दकोश संपूर्ण जगभरातील सुशिक्षितांच्या घरोघरी वापरला जातो असे म्हटले तर अतिशयोक्ती ठरू नये. ऑक्सफर्डच्या बृहत्-कोशाचे प्रकाशन १९३३ मध्ये पूर्ण झाले. त्या आधीच संक्षिप्त ऑक्सफर्ड कोशाची पहिली आवृत्ती १९११ मध्ये प्रसिद्ध झाली. बृहत्-कोशासाठी जमा झालेल्या सामग्रीचा उपयोग करण्याची परवानगी ऑक्सफर्ड विद्यापीठाच्या क्लॅरेंडन प्रेसने फाऊलर बंधुद्वयांना दिली. परंतु बृहत्-कोशाचे काम ''आर्'' या अक्षरापर्यंतच पूर्ण झाले होते. त्यामुळे ''एस् ते झेड्'' या अक्षरांसाठी फाऊलर बंधूंना इतर उपलब्ध शब्दकोश वापरावे लागले. त्यांच्या प्रथम आवृत्तीच्या प्रस्तावनेमध्ये त्यांनी the Imperial, the Century, the Standard, Cassell's Encyclopeadia आणि Webster या शब्दकोशांचा उल्लेख केलेला आहे. Concise Oxford Dictionary बरोबरच त्यापेक्षा मोठ्या आकाराचा द्विखंडात्मक Shorter Oxford English Dictionary (प्र.आ. १९३३) आता चौथ्या आवृत्तीचे नाव The New Shorter Oxford Dictionary on Histirical Principles. (१९९३) हा शब्दकोश, आणि The little Oxford Dictionary (प्र.आ. १९३०) आणि The Pocket Oxford Dictionary (प्र.आ. १९४२) हे दोन छोटेखानी कोश यांचीही निर्मिती झाली.

**२.५.४. हॉब्सन-जॉब्सन आणि अँग्लो-इंडियन कोश**

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत इंग्लिश भाषा ही भारतात बऱ्याचपैकी रुजली होती आणि भारतामध्ये तिच्यावर खास भारतीय संस्कारही होऊ लागलेले होते. या शब्दांचा आणि विशेषतः त्यांच्या व्युत्पत्तीचा अभ्यास फार रोचक होता. या शब्दांची दखल घेणारा अँग्लो-इंडियन शब्दांचा कोश यूल आणि बर्नेल यांनी १८८६ मध्ये Hobson-Jobson हे शीर्षक देऊन प्रसिद्ध केला. ऑक्सफर्डचा शब्दकोश प्रसिद्ध व्हायला प्रारंभ होऊन फक्त दोनच वर्षे झालेली होती, हे येथे ध्यानात घेण्यासारखे आहे. या शब्दकोशाचे उपशीर्षक या कोशाचा व्याप स्पष्ट करणारे आहेः A Glossary of Colloquial Anglo-indian Words and Phrases, and of Kindred Terms, Etymological, Historical, Geographical and Discursive.

''हॉब्सन-जॉब्सन'' हे नाव या कोशाला का दिले तेही पाहण्यासारखे आहे. (याला आधुनिक मराठी प्रतिशब्द शोधायचा तर ''धमाल'' असे म्हणता येईल?) मुहर्रमच्या वेळी छाती बडवताना ''या हसन? या हुसेन'' असा आक्रोश केला जातो; त्यावरून भारतातल्या इंग्रज सैनिकांच्या बोलण्यात हॉब्सन-जॉब्सन असा शब्द देशी उत्सवांमध्ये जो जल्लोष चालतो त्याला उद्देशून येऊ लागला असावा. यूल बर्नेल यांची नोंद पुढीलप्रमाणे आहेः

HOBSON-JOBSON : A native festal excitements; a tamasha...; but especially the Moharram ceremonies. This phrase may be taken as a typical one of the most highly assimilated class of Anglo-Indian argot, and we have ventured to borrow from it a concise alternative title for this Glossary. It is pecullar to the British soldier and his surroundings, with whom it probably originated, and with whom it is by no means obsolete, as we once supposed.. It is in fact an Anglo-Saxon version of the wailings of the Mahommedans as they beat breasts in the procession of the Moharram - "Ya Hasan! Ya Hossain!"...

हा कोश प्रसिद्ध झाल्याने इंग्लिशमधील कोशरचनेच्या कार्याला एक वेगळेच परिमाण लाभले यात काहीच शंका नाही. पुढच्या अनेक शब्दकोशांनी व विशेषतः व्युत्पत्ती-कोशांनी या कोशाचा वापर करून घेतलेला आहे. भारतीय इंग्लिशचे स्वरूप समजण्याच्या दृष्टीने अलीकडील काही प्रयत्नांचा उल्लेख करायला हवा. मात्र हे प्रयत्न फार लहान आहेत हेही येथे नोंदवायला हवे. ऑक्सफर्ड शब्दकोशाच्या Little Oxford Dictionary या रूपाची भारतीय आवृत्ती काढताना भारतीय इंग्लिश शब्दांची जी पुरवणी तयार झाली तिच्यात सुमारे दोन हजार शब्द होते. आता सुमारे अडीच हजार शब्दांचा Common Indian Words in English (१९८४) हा हॉकिन्झ यांचा कोश, तसेच निहलानी, टंग व होसाली यांनी तयार केलेला Indian and British English : A Handbook of Usage and Pronunciation (१९७९) हा कोश, हे अगदी छोटेखानी कोश स्वतंत्रपणे प्रसिद्ध झाले आहेत.

**२.५.५. व्युत्पत्ती-कोश व उच्चार- कोश**

ऑक्सफर्ड इंग्लिश शब्दकोशाला आवश्यक असणारी माहिती अनेक भाषाकोविदांनी आधीच गोळा करून तिची मांडणी करायला प्रारंभ केलेला होता. अँग्लो-सॅक्सन किंवा ओल्ड इंग्लिशचे क्रेंबिज विद्यापीठातील विशेषज्ञ डब्ल्यू. डब्ल्यू. स्कीट यांनी १८७९ ते १८८२ या कालखंडात Etymological Dictionary प्रसिद्ध करून ऑक्सफर्ड शब्दकोशाच्या कामाचा प्रारंभच करून दिलेला होता. मरी यांच्या ऑक्सफर्ड शब्दकोशाने या सर्व उपलब्ध सामग्रीचा भरपूर उपयोग करून घेतला. त्यानंतर १९२४ मध्ये अर्नेस्ट वीकल्री यांचा Etymological Dictionary of Modern English हा व्युत्पत्ती कोश १९२१ मध्ये प्रथम प्रसिद्ध झाला आणि त्याची concise किंवा अधिक सुटसुटीत आवृत्ती १९२४ मध्ये प्रसिद्ध झाली. सी.टी. अन्यन्झ यांनी संपादित केलेला ऑक्सफर्ड प्रकाशनाचा व्युत्पत्ती कोश १९६६ मध्ये निघाला.

व्युत्पत्ती कोशांच्या परंपरेतील महत्त्वाचा टप्पा एरिक पार्टरिज यांच्या Origins : A Short Etymological Dictionary of Modern English (१९५८) या कोशाने गाठला. सुमारे बारा हजार इंग्लिश शब्दांच्या व्युत्पत्ती या कोशात केवळ नोंदलेल्या नाहीत

तर शब्दांचे उपयोजन लक्षात घेऊन उलगडून दाखविलेल्या आहेत. उदाहरणार्थ, पुढील नोंद पाहाः

aesthete, aesthetic, aesthetics; anaesthesia, anaesthetic, anaesthetist : AE spelling esthete, etc.

1. Aesthete, from Gr. aisthetes, a (keen) perceiver; aesthetic, Gr. aishtetikos, sensory, sensitive; hence aesthetics-- cf ethics and adj. ethic...

2. Anaesthesia : Gr. anaisthesia, lack of feeling-- an-, not + a c/f var

(म्हणजे a combining form variant)of aisthesis, feeling...

वीकली आणि पार्टरिज यांच्या नोंदीची तुलना केल्यास पुढील गोष्टी सहज ध्यानात येतात. पार्टरिज यांच्या वर दिलेल्या नोंदीमध्ये aesthetic आणि anaesthetic या दोन्ही शब्दांमागे मूळ शब्द ग्रीक असून त्याचा संबंध perception, feeling यांच्याशी आहे, ही माहिती पार्टरिज यांनी एकत्र नोंदविलेली असल्याने अर्थांमधील संबंध लगेच ध्यानात येतो. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात aesthetics आणि ethics या क्षेत्रांमध्येही नाते आहे, त्याविषयी सूचनाही पार्टरिज यांनी केलेली आहे. येथे सुचविल्याप्रमाणे ethics या शब्दाविषयीची नोंद पाहिल्यास अर्थाच्या दृष्टीने त्यांच्यात एक विरोधाचे नाते आहे. असे ध्यानात येईल : ethics चे मूळ ग्रीक ethosशी आहे व त्याचा अर्थ custom, character and spirit of a people असा आहे. आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे पार्टरिज यांच्या कोशाचा उपयोग करण्यासाठी ग्रीक लिपी वाचता येण्याची गरज नाही, कारण मूळ ग्रीक शब्दही रोमन लिपीमध्येच दिलेले आहेत. उलट, अर्नेस्ट वीकली यांच्या व्युत्पत्ती-कोशामध्ये ग्रीक लिपी वाचता आल्याशिवाय मूळ ग्रीक शब्द समजू शकणार नाही. तसेच aesthetic आणि anaesthetic हे शब्द एकत्रही आणलेले नाहीतः मात्र, anaesthetic या शब्दाच्या नोंदीमध्ये "see aesthetic" अशी नोंद अर्थातच आहे. वीकली यांनी ethics या शब्दाचा उल्लेख या नोंदीमध्ये केलेला नाही. A Dictionary of Slang and Unconventional English (1936), Usage and Abusage : A Guide to Good English (1942), A Dictionary of Catch Phrases (1976) यांसारखे कोश रचल्याने पार्टरिज यांच्या व्युत्पत्तीच्या अभ्यासाला भाषिक उपयोजनविषयक विचाराचे एक वेगळेच परिमाण लाभलेले आढळते.

ऑक्सफर्ड इंग्लिश शब्दकोशाने निर्माण ठेवलेल्या प्रचंड भाषिक माहितीबरोबरच इंग्लिश भाषेचा अनेक अंगांनी अभ्यास करण्याची परंपरा भाषाभ्यासकांनी चालूच ठेवली आणि त्याला आधुनिक भाषावैज्ञानिक संशोधनाची जोड दिली. त्यातून भाषेच्या विशिष्ट पैलूवर लक्ष केंद्रित करणारे कोश सिद्ध झाले. उदाहरणार्थ, डॅन्यल जोन्झ यांचा English Pronouncing Dictionary हा कोश. स्वनवैज्ञानिक तत्त्वांचा आधार घेऊन प्रमाण

इंग्लिशच्या उच्चारणाचे वर्णन करणारा हा कोश प्रथम १९१७ मध्ये प्रसिद्ध झाला. डॅन्यल जोन्झ हे १९२१ ते १९४९ या कालखंडात लंडन विद्यापीठात स्वनविज्ञान या विषयाचे प्राध्यापक होते. त्यांच्या निधनापर्यंत, म्हणजे १९६७ पर्यंत, त्यांनी या कोशाच्या बारा सुधारित आणि विस्तारित आवृत्या काढल्या आणि सुमारे अठ्ठावन्न हजार शब्दांचे उच्चार नोंदविले. बाराव्या आवृत्तीपासून ए.सी. गिमसन या त्यांच्या शिष्याने या कोशाच्या सुधारित व विस्तारित आवृत्या संपादित करायला प्रारंभ केला. १९७७ ची सुधारित चौदावी आवृत्ती एकोणसाठ हजार शब्दांची आहे. १९८५ मध्ये प्रा. गिमसन यांचे आकस्मिकपणे निधन झाले. त्यानंतर अलीकडची चौदावी आवृत्ती काही पुस्त्या-दुरुस्तांसह १९८८ मध्ये काढण्यात आली व तिचे संपादन करताना सूझन रामशरण यांनी या कोशात जवळ जवळ हजार शब्दांची भर घातलेली आहे.

डॅन्यल जोन्झ यांनी आपल्या प्रस्तावनेत इंग्लिशच्या प्रमाणित उच्चारणाचा (Received Pronunciation) ऊहापोह केलेला आहे. इंग्लंडमधल्या पब्लिक स्कूल-पद्धतीमुळे सुशिक्षित इंग्लिश समाजामध्ये उच्चारांचे प्रमाणीकरण मोठ्या प्रमाणावर झालेले आढळते, आणि या प्रमाणित उच्चारांना कोशरूपामध्ये नोंदवल्याने हे प्रमाणित उच्चारण इंग्लंडमध्ये तसेच जगाच्या इतर भागांतही मोठ्या प्रमाणवर पोहोचले. मात्र जोन्झ यांनी प्रमाणित उच्चारणाची नोंद करणे एवढाच हेतू ठेवून इंग्लिशचा उच्चारण-कोश तयार केलेला होता आणि त्यांची मूळ भूमिका निःसंशयपणे वर्णनात्मकच होती.

I would add here that I do not regard RP as intrinsically "better" or more "beautiful" than any other form of pronunciation. I have recorded it because it happens to be the only type of English pronunciation about which I am in a position to obtain full and accurate information... I wish also to state that I have no intention of becoming either a reformer of pronunciation or a judge who decides what pronunciations are good 'and what are bad'. My aim is to observe and record accurately, and I do not believe in the feasility of imposing one particular form of pronunciation on the English-speaking world. I take the view that people should be allowed to speak as they like. And if the public wants a standardized pronunciation, I have no doubt that some appropriate standard will evolve itself.

अर्थात या कोशाची शैक्षणिक लोकप्रियता लक्षात घेता या उच्चारणाला आदेशात्मक स्वरूप प्राप्त होणे साहजिकच आहे. विशेषतः इंग्रजांनी राज्य केलेल्या भारतासारख्या देशात उच्च पातळीवर इंग्लिश शिकताना या कोशाचा वापर आदेशात्मक पद्धतीनेच केला जातो. भारतामध्ये इंग्लिशच्या प्राध्यापकांना प्रशिक्षित करण्याचे कार्यक्रम सेंट्रल इन्स्टिटयूट अव्ह इंग्लिश या संस्थेने १९६० च्या आसपास सुरू केले आणि त्यात स्वनविज्ञान या विषयाला खूपच महत्त्व होते. तेव्हापासून निदान पंचवीस वर्षे तरी डॅन्यल जोन्झ यांचा कोश म्हणजे





अनुक्रमणिका

भारतातील इंग्लिशच्या प्राध्यापकांचा ''पवित्र ग्रंथ'' बनलेला आहे. अलीकडे मात्र ''भारतीय इंग्लिश''ची जाणीव अधिक तीव्र होऊन एका वेगळ्या कोशाची गरज प्राध्यापकांना (आणि इंग्लिशचा वापर करणाऱ्या सुशिक्षितांनाही) वाटू लागलेली आहे, असे वाटते.

**२.५.६. उपयोजनविषयक कोश**

इंग्लिश भाषेच्या ऑक्सफर्डने काढलेल्या बृहत्कोशाबरोबरच भाषिक उपयोजनाविषयीच्या कोशांची रचनाही महत्त्वाची ठरू लागली. विशेषतः इंग्लिशमध्ये विविध प्रकारचे लेखन करणाऱ्यांसाठी केवळ शब्दांचे अर्थ देऊन भागणार नाही तर शब्दांचा संदर्भनिष्ठ वापर कसा होतो आणि कसा करायला हवा, याची माहिती आवश्यक आहे, ही जाणीव यामागे होती. हेन्री वॉटसन फाउलर यांनी त्यांचा भाऊ फ्रॅन्सिस जॉर्ज फाउलर यांच्या सहकार्याने १९११च्या सुमाराला या प्रकारच्या कोशावर काम सुरू केले आणि १९२६ मध्ये A Dictionary of Modern English Usage हा अत्यंत गाजलेला कोश प्रसिद्ध केला. हेन्री वॉटसन फाउलर स्वतःशालेय शिक्षक होते. आपल्या भावाच्या सहकार्याने त्यांनी इंग्लिश भाषेचे प्रमाणीकरण करणारे अनेक ग्रंथ रचले. आधी उल्लेखिल्याप्रमाणे Concise Oxford Dictionaryचे संपादन करण्याचा, तसेच Pocket Oxford Dictionary संपादन करण्याचा अनुभव त्यांच्या गाठी होताच. The King's English या ग्रंथात त्यांनी प्रमाण इंग्लिशच्या वापरामधील चुकांचे दिग्दर्शन केलेले होते. भल्या-मोठ्या शब्दांचे अवडंबर, अकारण केलेले अलंकरण, विद्वज्जडता, उच्चभ्रूपणाचे स्तोम, यांसारख्या लेखन-दोषांपासून कसे वाचवता येईल याचे दिग्दर्शन करू पाहणाऱ्या फाउलर यांच्या या कोशाने आधुनिक इंग्लिश गद्यलेखनासाठी काही मानदंडच निर्माण केले. अर्थात आधुनिक भाषाविज्ञानाने या प्रकारच्या ''आदेशात्मक'' व्याकरणिक व उपयोजनविषयक मांडणीवर काही मूलभूत स्वरूपाचे आक्षेप घेतलेले आहेत, हे मात्र येथे नमूद करून ठेवायला हवे. त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे या प्रकारच्या कोशांमधून भाषेच्या ''योग्य, उत्तम'' वापराचे काही बटबटीत संकेत व दृष्टिकोन निर्माण होऊ लागतातः प्रमाण भाषा हीच ''खरी'' भाषा, इतर भाषाभेद हे ''चुकीचे, अ-प्रमाण'', असे दृष्टिकोन निर्माण होतात. भाषेची लवचिकता आणि एकूण व्याप्ती त्यामुळे कमी होऊ लागते. भाषा शिकता-शिकवताना काही प्रमाणात आदेशात्मक दृष्टिकोन अपरिहार्य असतो, परंतु प्रमाण भाषेबरोबरच प्रत्येक भाषेला इतर भेदही असतात, व त्यांच्याविषयी संवेदनशील राहणे आवश्यक असते, ही जाणीवही अध्ययन व अध्यापन या प्रक्रियांमध्ये महत्त्वाची असते. फाउलर यांच्या कोशावर आधारुन त्याचा एक अमेरिकन अवतार मार्गरिट निकल्सन यांनी A Dictionary of American-English Usage (१९५६) तयार केला. फाउलर यांचा कोश अधिक सुलभ स्वरुपात मांडणे, तसेच त्यात अमेरिकन इंग्लिशमधील उपयोजनविषयक माहितीची भर घालणे, हे कार्य मागरिट निकल्सन यांच्या कोशाने





अनुक्रमणिका

बजावले. स्पेलिंग, उच्चारण, शैली, संदर्भनिष्ठ उपयोजन या दृष्टीने या प्रकारच्या कोशांमधून अत्यंत बहुमोल माहिती मिळते. उदाहरणार्थ, इंग्लिशच्या लेखनामध्ये एक नेहमी अढळणारे स्पेलिंग म्हणजे -ize / -ise हे होय. मार्गरिट निकल्सन यांच्या कोशातली "ize, ise, in verbs यावरची नोंद येथे वानगीदाखल नोंदवण्यासारखी आहेः

In the vast majority of verbs that end in -ize or -ise and are pronounced -iz, the ultimate source of the ending is the Greek -izo. Many English printers follow the French practice of changing -ize to ise; but the OED, The Times, and American usage, in all of which -ize is the accepted form, carry authority enough to outweigh superior numbers..

It must be noticed, however, that a small number of verbs, some of them in very frequent use, like advertise, devise, and surprise, do not get their -ise even remotely from the Greek -izo, and must be spelled with -s-...

इंग्लिश भाषेच्या व्याकरणाच्या दृष्टीने "It is me" हे वाक्य अत्यंत वादग्रस्त वाक्य आहे. पारंपरिक व्याकरणकारांच्या दृष्टीने हे "It is I" असे हवे. परंतु व्याकरणाचे स्वरूप आदेशात्मक नसावे, तर प्रत्यक्ष व्यवहारात व्याकरणाचे कोणते नियम वापरले जातात याची नोंद करणारे असावे, अशी भूमिका आधुनिक व्याकरणकारांनी घेतल्याबरोबर या वाक्याविषयी वाद सुरू झाले, कारण अगदी एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीलासुद्धा सुशिक्षित इंग्लिश माणसाच्या नेहमीच्या बोलण्यात "It is me" असेच वाक्य येत असे. एरिक पार्टीरिज यांच्या Usage and Abusage (१९४७) या उपयोजनाविषयक कोशात "It is me" या वाक्यावर नोंदच दिलेली आहे. प्रारंभी सी.टी.अन्यन्झ या ऑक्सफर्ड शब्दकोशाच्या सह-संपादकाच्या An Advanced English Syntax (१९०४) या ग्रंथामधून माहिती उद्धृत केलेली आहे व नंतर त्याविषयी चर्चा आहेः

'It is me for it is I 'is a form of speech frequent in current English and is used even by educated speakers, who would not, however, say "It's him", "It's her", "It's us", or "It's them", these being generally regarded as vulgar or dialectal. The sound-analogy of (it is) he, (it is) she, (it is) we has no doubt furthered the use of me as a regular and natural form of expression in such cases', which is not to say that Dr. Onions (An Advanced English Syntax) recommends its use. It is to be noticed that those educated speakers who say it's me' or 'It is me' would not say 'It is me who wrote that essay'. It is me (or it's me) is defensible, however, when the statement is exclamatory, (In America, It's me is acceptable colloquial English; that is, It is used in good speech. There is no occasion to write it. Us, him, her, them are less common after to be, and their acceptableness is disputed. However, when a pronominal subject is not followed by its verb, the

pronoun often appears in the objective case. That is, the habits of word-order are stronger that the habits of inflexion. We expect subject + verb + object.)

पारंपरिक व्याकरणकारांनी दिलेले नियम तर सोडवत नाहीत, पण सुशिक्षितांच्या प्रत्यक्ष वापरात ते नियम पाळलेले दिसत नाहीत, असा हा एकूण पेच आहे. कालबाह्य झालेले नियम सोडून देऊन नवा नियम स्वीकारण्यासाठी लागणारे धाडस या कोशकारांकडे नव्हते, असा याचा अर्थ आहे.

**२.५.७ अध्यापनलक्ष्यी कोश**

बहुतेक लोकांच्या मनात शब्दकोश म्हणजे शब्दांचा अर्थ देणारा कोश असे समीकरण पक्के बसलेले असते. फाउलर, मार्गरिट निकल्सन आणि पार्टरिज यांच्या उपयोजविषयक कोशांनी या कल्पनेला धक्का दिलेलाच होता आणि कोशाची संकल्पना बरीच विस्तृत केलेली होती. त्यातच इंग्लिश भाषेचा प्रसार जगाच्या विविध भागांमध्ये होऊन ही भाषा आंतरराष्ट्रीय संपर्काची, आर्थिक उलाढालीची आणि उच्च शिक्षणाची भाषा म्हणून अनेक देशात पुढे येऊ लागली होती. दुसऱ्या महायुद्धानंतर इंग्लिश भाषेचे परभाषा म्हणून अध्ययन करणाऱ्यांसाठी शब्दकोश आणि इतर प्रकारची अध्यापन-सामग्री तयार करण्याचे प्रयत्न मोठ्या प्रमाणावर सुरू झाले. किंबहुना ''परभाषा वा द्वितीय भाषा म्हणून इंग्लिशचे अध्यापन'' (Teaching of English as a Second / Foreign Language) हे इंग्लिश भाषेच्या विशेष अभ्यासाचे वा संशोधनाचे एक प्रमुख उपक्षेत्र (field of specialization) मानले जाऊ लागले. भारतामध्ये ते इंग्लिशच्या प्राध्यापकांना प्रशिक्षण देणाऱ्या व संशोधनाच्या संधी उपलब्ध करून देणाऱ्या सेंट्रल इन्स्टिटयूट अव्ह इंग्लिश या संस्थेने १९६० च्या आसपास सुरू केले, याचा उल्लेख डॅन्यल जोन्झ उच्चारकोशाची चर्चा करताना आलेला आहेच. अशा तऱ्हेच्या संस्था जगातील अनेक देशात प्रस्थापित होऊन परभाषकांच्या इंग्लिश भाषेची, त्यांच्या खास अडचणींची जाणीव ठेवून निर्माण झालेल्या कोशांना (learner dictionaries) महत्त्व प्राप्त झाले.

या पद्धतीचा पहिला महत्त्वाचा प्रयत्न १९३७-४० च्या सुमारास ए.एस्. हॉर्नबी, ई.व्ही. गेटन्बी आणि एच्. वेकफिल्ड या इंग्लिशच्या अध्यापकांनी जपानमध्ये केला. टोकिओच्या ''इन्स्टिटयूट फॉर रिसर्च इन इंग्लिश टीचिंग'' या संस्थेने १९४२ मध्ये Idiomatic and Syntactic English Dictionary हा या तीन अध्यापकांनी तयार केलेला कोश प्रसिद्ध केला. त्यातूनच The Advanced Learner's Dictionary of Current English (प्र. आ. : १९४८; दु. आ. : १९६३; ति. आ. : १९७४; चौ.आ. : १९८९) हा अध्यापनलक्ष्यी कोशांमधील पहिला महत्त्वाचा टप्पा साकार झाला. हॉर्नबी यांनी शालेय पातळीवरील वापरासाठी ई.सी. पार्नल यांच्या सहकार्याने The Progressive English Dictionary आणि An English Reader's Dictionary हे कोशही

सिद्ध केले. परंतु Advanced Learner's Dictionary या कोशाने अध्यापनलक्ष्यी कोशांची एक परंपराच निर्माण केली.

स्वनविज्ञानातील संशोधनाच्या आधारे तयार झालेली आंतरराष्ट्रीय स्वनलेखन पद्धती (International Phonetic Script) वापरून इंग्लिशमधील शब्दांचे उच्चारण देण्यास डॅन्यल जोन्झ यांनी आपल्या उच्चार-कोशाद्वारे १९१७ पासूनच प्रारंभ केलेला होता, हे आपण पाहिले आहे. याच लिपीला थोडे अधिक सुटसुटीत स्वरूप हॉर्नबी यांच्या कोशाने दिले आणि प्रत्येक शब्दातील स्वर व व्यंजने, त्यातील स्वनावयाची फोड (syllabification), त्यातील आघाताची जागा (stress), यांची माहिती Advanced Learner's Dictionary मध्ये अंतर्भूत झाली. खास अमेरिकन उच्चार आणि स्पेलिंग यांचाही निर्देश करण्यात आला.

पारंपरिक शब्दकोशामध्ये शब्दाची व्याकरणविषयक माहिती केवळ नाम, क्रियापद (सकर्मक वा अकर्मक), विशेषण इत्यादी शब्दजाती व उपजातींपुरती मर्यादित असे. Advanced Learner's Dictionary या कोशाचे वैशिष्ट्य म्हणजे क्रियापदाला वाक्याचा गाभा मानून इंग्लिशमध्ये मूलभूत ठरणाऱ्या सुमारे पंचवीस वाक्यबंधांची (verb patterns) एक यादी तयार करून प्रत्येक क्रियापद कोणत्या बंधानुसार चालू शकते त्याचा निर्देश केलेला आहे. त्यामुळे कोश वापरणाऱ्या विद्यार्थ्याला शब्दांचा वाक्यात उपयोग कसा होतो हे समजण्याच्या दृष्टीने बहुमोल माहिती मिळते. नामांच्या बाबतीतही ''गणनयोग्य''(countable) व ''अगणनयोग्य'' (uncountable) नामे हा महत्त्वाचा भेद या कोशामध्ये अंतर्मूत करण्यात आला.

या शब्दकोशात शब्दांचा उपयोग करणाऱ्या वाक्यांची उदाहरणेही पारंपरिक कोशापेक्षा बरीच अधिक दिलेली आहेत. त्याचबरोबर विशिष्ट शब्दांचा उपयोग जुनाट आहे का, खास साहित्यिक आहे का, केवळ बोलभाषेतला (colloquial) आहे का, खास अमेरिकन इंग्लिशमध्ये वापरला जाणारा आहे का, अशी उपयोजनविषयक माहितीही मिळते. यातल्या काही पैलूंना शैलीनिष्ठ घटक (stylistic features) म्हटले जाते. भाषेवर प्रभुत्व मिळवायचे तर हे शैलीनिष्ठ घटकही आत्मसात करावे लागतात; उदाहरणार्थ, ''जुनाट'' (archaic), ''बोलभाषेतील'' (colloquial), ''निंदाव्यंजक'' (derogatory), ''स्तुतिव्यंजक'' (laudatory), ''निषिद्ध'' (taboo), इत्यादी. मातृभाषेच्या बाबतीत या घटकांचे ज्ञान सहजपणे आत्मसात होते. परभाषेच्या बाबतीत मात्र औपचारिक अध्ययन -अध्यापनाच्या प्रक्रियेत त्यांचा अंतर्भाव करावा लागतो. त्याचप्रमाणे एखादा नेहमीच्या वापरातील शब्द विशिष्ट संदर्भक्षेत्रात (register) विशेष अर्थाने वापरला जातो; केवळ तांत्रिक परिभाषेत वापरल्या जाणाऱ्या संज्ञांपेक्षा या शब्दांचे स्वरूप काहीसे वेगळे असते. या शब्दांविषयीचे ज्ञानही भाषा प्रत्यक्ष वापरण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे असते; उदाहरणार्थ, विशिष्ट खास खेळांशी निगडित असणारे शब्द (उदा. क्रिकेट किंवा बेसबॉल

या खेळांमध्ये run या शब्दाला खास अर्थ आहेत), विशिष्ट विज्ञानक्षेत्रांतील शब्द (उदा. compound या शब्दाला रसायनविज्ञानात किंवा व्याकरणात खास अर्थ आहेत.)

ऑक्सफर्ड प्रकाशनाने परभाषकांसाठी हा अध्यापनलक्ष्यी कोश प्रकाशित केल्यानंतर लाँगमन, चेंबर्झ, कॉलिन्झ आणि अगदी अलिकडे केंब्रिज या प्रकाशनांनीही याच प्रकारचे परंतु काहीशा वेगळ्या पद्धती वापरणारे महत्त्वाचे कोश प्रकाशित केलेले आहेत. या सर्व कोशांची काही समान वैशिष्ट्ये आहेत. एक म्हणजे संगणकाच्या मदतीने इंग्लिशच्या प्रत्यक्ष वापराच्या विश्लेषणाचे मोठे संशोधन - प्रकल्प या कोशांच्या मागे आहेत. दुसरे म्हणजे, भाषेच्या संदर्भनिष्ठ वापराच्या अभ्यासाचे एक नवे क्षेत्र १९६०पासून महत्त्वाचे मानले गेलेले आहे; त्याला भाषेची ''कार्यलक्ष्यी मीमांसा'' (pragmatics) असे नाव भाषावैज्ञानिकांनी दिलेले आहे (पाहाः मालशे १९९५: १००-१६). भाषेच्या कार्यलक्ष्यी मीमांसापद्धतींचा वापर करून आणि इंग्लिशचा परभाषा म्हणून वापर करणाऱ्यांच्या अडचणींचे व चुकांचे विश्लेषण करून हे सर्व शब्दकोश सिद्ध करण्यात आलेले आहेत. त्यासाठी शब्दांच्या नोंदीमध्ये विविध प्रकारच्या उपयोजनसंबंधी लेबलांचा अंतर्भाव करण्याची पद्धत या कोशांनी वापरलेली आहे. कोणत्याही व्यक्तीला भाषेच्या शब्दांचे जे ज्ञान असते त्याचे दोन प्रकार असतात. एक म्हणजे शब्दाची ओळख पटण्यापुरते ज्ञान; वाचन करताना असे अनेक शब्द आपल्याला भेटतात आणि ते आपल्याला ''गेलेले'' असतात, म्हणजे परिचित असतात पण आपल्या स्वतःच्या भाषिक व्यवहारात त्या शब्दांचा वापर करू शकू असे नाही. या दोन प्रकारच्या शब्दांना ''परिचित शब्द'' (passive vocabulary) आणि ''मित्र शब्द'' (active vocabulary) असे म्हणतात. शब्दांचा केवळ अर्थ समजून घेण्यासाठीच नव्हे तर शब्दांचा प्रत्यक्ष वापर करण्याच्या दृष्टीने जास्तीत जास्त मदत कशी देता येईल या भूमिकेमधून या कोशांची निर्मिती झालेली आहे.

Longman Dictionary of Contemporary English (१९७८: प्र. आ.; १९८९: दु. आ.) या कोशामागे Longman Citation Corpus हा सुमारे अडीच ते तीन कोटी शब्दांचा मूलभूत सामग्रीसंच (corpus/database) आहे. दोन हजार सोप्या शब्दांची defining vocabulary वापरून सुमारे छप्पन हजार शब्दांच्या अर्थाचे विवरण या शब्दकोशात केलेले आहे. शिवाय या शब्दांचे कार्यलक्ष्यी विश्लेषण करून या शब्दकोशातील नोंदींना सुमारे वीस भाषिक वापरासंबंधीच्या खास टिपणांची (Language Notes)जोड देण्यात आली आहे. उदाहरणार्थ, इंग्लिशच्या निजभाषकांच्या सर्वसामान्य वापरामध्ये रोखठोक विधान करणे हे काहीसे उद्धट वा असंस्कृत मानले जाते; maybe, perhaps, possibly, I wonder, not quite यांसारखे tentative प्रयोग वापरून ठामपणा, रोखठोकपणा व पर्यायाने उद्धटपणा टाळता येतो. इंग्लिशच्या या संदर्भनिष्ठ वापराच्या वैशिष्ट्याविषयी माहिती देणारी खास टिपणे लाँगमन शब्दकोशामध्ये Addressing People, Apologies, Criticism and Praise, Invitations and Offers, Politeness, Requests, Tentativeness, Thanks यांची नोंद

करताना दिलेली आहेत. या कोशामधील people आणि persons या दोन शब्दांतील उपयोजनात्मक साम्यभेद दर्शविणारी नोंदही उल्लेखनीय आहेः The usual plural of person is people. "Only one person / A lot of people replied to our advert." Persons is formal, and is often used in official writings, notices, etc. : "He was murdered by a person or persons unknown."

कॉलिन्झ प्रकाशनाच्या मदतीने बर्मिंगहम विद्यापीठाच्या इंग्लिश विभागामध्ये सुमारे सात वर्षे चाललेल्या Collins-Birmingham University International Language Database (COBUILD) या संशोधन- प्रकल्पामध्ये ग्रंथ, नियतकालिके, वृत्तपत्रे, पत्रके, प्रत्यक्ष संभाषणे, रेडिओ व टेलिविजनवरील प्रक्षेपणे, इत्यादी अनेक प्रकारच्या सामग्रीमधून आधुनिक इंग्लिशच्या लिखित व बोली वापराचे लाखो नमुने गोळा करण्यात आले. त्यांचे संगणकाच्या साहाय्याने अत्यंत तपशीलवार विश्लेषण करून त्याच्या आधारे शब्दांचे विविध अर्थ, व्याकरणिक कार्ये, उपयोजनविषयक माहिती Collins Cobuild English Language Dictionary (१९८७) या कोशामध्ये संकलित करण्यात आली. या कोशाच्या मांडणीचे प्रमुख वैशिष्टय म्हणजे अर्थ देताना शब्दाला प्रतिशब्द देण्याची पारंपरिक शब्दकोशांची पद्धत न वापरता संपूर्ण वाक्य वापरून अर्थ देण्याची पद्धत या शब्दकोशात अवलंबिलेली आहे. त्यामुळे शब्दकोश वापरणाऱ्याला इंग्लिशच्या वाक्यरचनेचा जास्तीत जास्त अनुभव मिळत राहतो आणि वाक्यार्थाबरोबरच वाक्यरचना आणि शब्दांचे विविध संदर्भातील उपयोजन यांचे ज्ञान लगेच मिळते. उदाहरणादाखल देण्यात आलेली वाक्येसुद्धा मुद्दाम तयार न करता मूळ वापरामधून उचलून दिलेली असल्याने इंग्लिशच्या प्रत्यक्ष वापराच्या जास्तीत जास्त जवळ जाण्याच्या प्रयत्न या कोशाने केलेला आहे, असे म्हणता येईल.

मात्र या प्रकारच्या कोशरचनेच्या काही मर्यादाही ध्यानात घेतल्या पाहिजेत. वाक्याच्या साहाय्यानेच अर्थ द्यायचा असा नियम COBUILD च्या कोशकारांनी केल्यामुळे काही गफलतीही होऊ शकतात. पुढील उदाहरणे पाहा. (१) काही वेळा जे काम एखादा साधा प्रतिशब्द देऊन साधण्यासारखे असते तेथे ही अर्थ देणारी वाक्ये काहीशी कृत्रिम वाटू शकतात. विशेषतः क्रियापदांचा अर्थ देताना सतत when someone does something, they..., किंवा If you do something, you... अशा फारशा स्वाभाविक नसणाऱ्या बोजड (clumsy) रचना इतक्या वेळा वापराव्या लागतात की या इंग्लिशमधल्या मूलभूत रचना आहेत असेच वाटू लागते. (२) यात पुन्हा स्त्रीवादी चळवळीच्या दडपणामुळे he हे सर्वमान वापरता येत नसल्याने सतत you किंवा someone हे शब्द वापरावे लागतात, व त्यामुळे वाक्यरचनेची कसरत अधिकच अवघड बनते. "bathe" या क्रियापदाचा अर्थ या कोशात पुढीलप्रमाणे दिलेला आहेः If you bathe or go bathing, you swim or play in a sea, lake or other large area of water. (३) एखादी गोष्ट करणे व होणे यांतील महत्त्वाच्या भेदांकडे दुर्लक्ष

करून "blinks" या क्रियापदाच्या अर्थाचे विवरण पुढीलप्रमाणे केलेले आहेः When someone blinks, when they blink their eyes, or when their eyes blink, they shut their eyes and quickly open them again.

केंब्रिज प्रकाशनाचा Cambridge international Dictionary of English (१९९५) हा शब्दकोश The Cambrige Language Survey या संशोधन प्रकल्पाचे फलित आहे. इंग्लिशच्या निजभाषकांकडून तसेच परभाषा म्हणून इंग्लिश वापरणाऱ्या learners कडून मिळविलेली भाषिक सामग्री सुमारे दहा कोटी (100 million) शब्दांची होती. या प्रकल्पात तिचे विश्लेषण करून सुमारे पन्नास हजार मुख्य शब्दांवर कोशाच्या नोंदी तयार करण्यात आल्या व सर्व मिळून एक लाख शब्द व वाक्प्रयोग यांचे स्पष्टीकरण या कोशात ग्रथित करण्यात आले आहे. लाँगमनच्या शब्दकोशाप्रमाणे याही शब्दकोशात दोन हजार सोप्या व मूलभूत शब्दांचा वापर अर्थविवरणासाठी केलेला आहे. व ही defining vocabulary शब्दकोशाच्या शेवटी दिलेली आहे. शब्दांच्या कार्याविषयीच्या व उपयोजनाविषयीच्या माहितीचे चिन्हांकन मुख्यतः तीन प्रकारच्या लेबलांनी केलेले आहे. एक म्हणजे इंग्लिशचे राष्ट्राराष्ट्रानुसार होणारे उपभेद Am (North American), Aus (Australian), Br (British), Canadian, Irish, Scot या लेबलांनी नोंदविलेले आहेत. दुसरे म्हणजे, शब्दांच्या वापरांची विषयक्षेत्रे law, medical, literary यांसारख्या लेबलांच्या मदतीने दर्शविली आहेत. तिसरे म्हणजे वापराचा संदर्भ औपचारिक आहे की अनौपचारिक आहे, तसेच वापरणाऱ्याचा कोणता दृष्टिकोन शब्द व्यक्त करतात याची नोंद fml, infml, taboo (निषिद्ध), approving, disapproving, humorous यांसारख्या लेबलांनी केलेली आहे.

**३. समारोप : मराठीसाठी नव्या दिशा**

विसाव्या शतकामध्ये उपयोजनलक्ष्यी आणि अध्यापनलक्ष्यी शब्दकोशांनी भाषेचे प्रमाणीकरण करण्याची आदेशात्मक भूमिका न घेता प्रमाण भाषेचे स्वरूप नोंदविणे आणि त्याचबरोबर प्रमाणेतर भेदाचीही शक्यतो दखल घेणे, हे आपले प्रमुख उद्दिष्ट मानलेले आहे, याचा उल्लेख या लेखात आधी आलेला आहे. मात्र कोशकारांनी आदेशात्मक भूमिका टाळण्याचा कितीही प्रयत्न केला तरी कोश निर्माण होणे ही प्रक्रियाच अप्रत्यक्षपणे भाषेचे नियमन आणि प्रमाणीकरण करीत असते हेही नाकारता येणार नाही. समाजात आत्मभान निर्माण झाल्याखेरीज कोश निर्माण होऊ शकणार नाहीत ही वस्तुस्थिती आहे. आणि आत्मभान निर्माण झाले की सुस्पष्टपणे नियमन व प्रमाणीकरण होण्याची गरज निर्माण होते. या बाबतीत वापर वा उपयोजनाची केवळ नोंद घेणे ही टोकाची वर्णनात्मक भूमिका एका बाजूला आणि प्रतिष्ठित व उच्चभ्रू वर्गाने आपल्या स्वतःच्या निकषानुसार सत्तेच्या व अधिकाराच्या आधारे उपयोजनाचे नियमन करणे ही दुसऱ्या टोकाची आदेशात्मक भूमिका, या दोन्ही टाळून एक समन्वयवादी भूमिका घेणे कोणत्याही कोशाला आवश्यक ठरते.





अनुक्रमणिका

भाषेचा प्रत्यक्ष वापर कसा होतो आहे, याची पर्वा न करता केवळ सामाजिक-सांस्कृतिक अधिकार वापरून प्रमाणीकरण करू पाहणे हे अर्थातच लोकशाही तत्त्वांच्या विरूद्ध जाणारे ठरेल. मात्र त्याचबरोबर लोकशाहीचा अर्थ झुंडशाही असा करून भाषेला प्रमाण स्वरूपच नसते वा त्याची गरजच नसते असे म्हणणे हे आंधळेपणाचे ठरेल. प्रमाणेतर मानल्या जाणाऱ्या बोलींच्या वापरामध्येसुद्धा - उदाहरणार्थ, ग्रामीण बोलींमध्येसुद्धा - व्याकरणव्यवस्था आणि उपयोजनव्यवस्था अस्फुट स्वरूपात असतातच. त्या नसतील तर कोणताच व्यवहार शक्य होणार नाही.

मराठीमध्ये कोशवाङ्मयासंबंधीची जाणीव निर्माण झालेली आहे. केतकरांचा महाराष्ट्रीय ज्ञानकोश (१९२१-२९), दाते-कर्वे यांचा महाराष्ट्र शब्दकोश (१९३२-५०), महादेवशास्त्री जोशींचा भारतीय संस्कृती कोश (१९६२), वाडेकरांचा मराठी तत्त्वज्ञान महाकोश (१९७४), गर्गे यांचा भारतीय समाजविज्ञानकोश (१९८६), मराठी विश्वकोश (प्रथम खंड १९७६ पासून पंधरावा खंड १९९५ पर्यंतः अजून प्रकाशन चालू) यांसारख्या कोशांमधून मराठी समाजाला आत्मभान आलेले आहे, हे स्पष्ट जाणवते. परंतु वेगवेगळ्या दृष्टिकोनांमधून तयार केलेले, नवीन अभ्यासपद्धती व संशोधन-सामग्री वापरून सिद्ध झालेले कोश अभावानेच आहेत. कोशाची निर्मिती आणि त्यांचा वापर, यात सध्या एक मरगळ जाणवते. ''मराठी कोश-वाङमयाची निर्मिती का रोडावली?'' हा लेख लिहून डॉ. अरुण टिकेकर (१९९६) यांनी या संदर्भात आपल्या वैचारिक दिवाळखोरीवर कोरडे ओढलेले आहेत. प्रा. मे. पुं. रेगे (१९९६) यांनी मराठी भाषेच्या स्थितीविषयी आणि ज्ञानकोशांच्या मराठीतील गरजेविषयी परखड विवेचन केलेले आहे. श्रीनिवास हेमाडे (१९९६) यांनी ''कथा विश्वकोशाची'' या विषयावरील दोन लेखात पाश्चात्य विश्वकोश प्रकल्पांची ऐतिहासिक पार्श्वभूमी मराठीमध्ये स्पष्ट करून सांगितलेली आहे. इंग्लिशमधील कोशरचनेमधील नवनवीन प्रयोगांची माहिती करून घेऊन त्यातून आपल्याला उपयुक्त असणाऱ्या पद्धती आत्मसात करून मराठीचे ज्ञानकोश व शब्दकोश सिद्ध करणे, हे उद्दिष्ट कोशकारांनी ठेवणे आवश्यक आहे. त्यातूनच मराठी कोशवाङमयाला नवी दिशा मिळू शकेल.

## संदर्भसूची

### इंग्लिश

The Advanced Learner's Dictionary of Current English. पाहाः Hornby. Allen, Harold B. (ed.) (1971 : Indian Ed.) Readings in Applied English Linguistics. New Delhi : Amerind. (Part VI : Linguistics and the Dictionary).

Apte, V. S. (1890 / 1964) The Student's Sanskrit-English Dictionary, Delhi : Shantilal Jain.

Brewer, Ebenezer Cabham (1989 : चौदावी आ.) A Dictionary of

Phrase and Fable. London : Cassell. (प्र.आ. १८७०).
Cambridge International Dictionary of English (1995) Cambridge : CUP. (Ed. - in - chief : Paul Proctor)
Cohen, J. M. & M. J. Cohen (1960) The Penguin Dictionary of Quotations. Harmondsworth, Middlese Middlesex : Penguin Books.
Collins Cobuild English Language Dictionary. पाहा: Sinclair, John (ed.) (1987) The New Collins Thesaurus (1984). London : Collins.
The Concise Oxford Dictionary of Current English. पाहा : Fowler, H. W. and F. G. Fowler (eds.) (1964)
Drabble, Margaret & Jenny Stringer (1987) The Concise Oxford Companion to English Literature. Oxford : OUP
Fowler, H. W. and F. G. Fowler (eds.) (1964 पाचवी आ.) The Concise Oxford Dictionary of Current English, Oxford : Clarendon press. (प्र. आ. : 1911)
Fowler, H. W. (1968 : दु. सुधा. आ., संपा.: Ernest Gowers) A Dictionary of Modern English Usage, London : ELBS & OUP.
Hart, James D. (1965 : 4th ed.) The Oxford Companion to 'American Literature. N. Y. : OUP. (first pub. 1941)
Hartmann, R. R. K. (ed.) (1983) Lexicography : Principles and Practice. London : Academic Press.
Hawkins, R. E. (ed.) (1984) Common Indian Words in English. Delhi : OUP.
Hornby, A. S. et al (1948 : प्र.आ. ; 1963 : दु.आ.; 1974 : ति. आ.; 1989: चौ . आ.) The Oxford Advanced Learner's Dictionary of Current English. London : ELBS & OUP.
Jonson, Robert (ed.) (1985) Dictionary, Lexicography and Language Learning. Oxford  Pergamon Press & The British Council.
Jones, Daniel (1988 : चौदावी आ.) Everyman's English Pronouncing Dictionary. London : J. M. Dent. (प्र. आ. 1917)
Kirkpatrick, E. M. (ed.) (1980) Chambers Universal Learner's Dictionary. Delhi : Chambers / Macmillan India.
The Little Oxford Dictionary of Current English. पाहा: Swannell, Julia (ed.) (1986)
Longman Dictitionary of Contemporary English (1978 : प्र.आ.; 1987 : दु.आ.) Harlow, Essex : Longman.
Murrey, James A. H., Henry Bradley, W. A. Craigie, and C. T.





अनुक्रमणिका

Onions (eds.) (1933) The Oxford English Dictionary. Oxford : Clarendon Press. (Reissue of A New English Dictionary on Historical Principles.)

A New English Dictionary on Historical Principles. पाहा: Murrey et al (1933).

Nicholoson, Margaret (1957) A Dictionary of American-English Usage. N. Y. : Signet Books.

Nihlani, Tongue, Hosall (1979) Indian and British English : A Handbook of Usage and Pronunciation.

Onions, C. T. (1986 : 3rd ed. Enlarged & revised by Robert D. Eagleson) A Shankespeare Glossary. Oxford : Clarendon Press. (टीप: अहो आश्चर्यम् ? या कोशाच्या तिसऱ्या आवृत्तीमध्ये पहिल्या दोन आवृत्त्यांचे प्रकाशनवर्ष कोठेही दिलेले नाही. फक्त ईगलसन यांच्या प्रास्ताविकात दुसरी आवृत्ती १९१९ मध्ये प्रकाशित झाल्याचा उल्लेख आहे. The Pelican Guide to English Literature (ed. Boris Ford) (19 ) या ग्रंथमालेच्या शेक्सपिअर-खंडाच्या (vol. 2 : The Age of Shakespeare) ग्रंथसूचीमध्ये या ग्लॉसरीचे प्रकाशन वर्ष १९११ दिलेले आहे, ते पहिल्या आवृत्तीचे असावे.)

Onions, C. T. et al (eds.) (1966) The Oxford Dictionary of English Etymology. Oxford : Clarendon Press.

The Oxford Advanced Learner's Dictionary of Current English. पाहा : Hornby.

The Oxford Advarced Learner's Dictionary of Current English : Encyclopedic Edition (1992) Oxford : OUP.

The Oxford Dictionary of Quotations (1953 : दु.आ.) London : OUP (प्र.आ.:1941)

The Oxford English Dictionary पाहा: Murrey et al (1933)

The Oxford Thesaurus. पाहा: Urdang (1991)

Partridge, Eric (1963) Usage and Abusage : A, Guide to Good English, Harmondsworth, Middlesex : Penguin Books. (First pub. 1942)

--- (1965) Origins : A Short Etymological Dictionary of Modern English. N. Y. : Greenwich House. (First pub. 1958)

--- (1976) A Dictionary of Catch Phrases. N. Y. Stein and Day.

Reader's Digest Reverse Dictionary (1989). London : The Reader's Digest Association Ltd.

Rideout, Ronald & Clifford Witting, (1967) English Proverbs Explained. London : Pan Books.

Roget, Peter Mark (1978 : Indian Edition) Roget's International

Thesaurus. New Delh. Oxford & IBH. (Roget ची प्र. आ 1852; Roget' International Thesaurus ची तिसरी आवृत्ती 1962).

Sinclair, John (ed.) (1987) Collins Cobuild English Language Dictionary. London : Collins.

Swannell, Julia (ed.) (1986 : सहावी आ.) The Little Oxford Dictionary of Current English. Delhi : OUP (प्र. आ. 1930, संपा. George Ostler)

Urdang, Lawrence (1991) The Oxford Thesaurus : The A-Z Dictionary of Synonyms. Oxford : Clarendon Press.

Watson, Owen (ed.) (1976) Longman Modern English Dictionary. London : Longman. (प्र. आवृत्तीचे शीर्षक : Longman's English Larousse, 1968)

Webster's New Collegiate Dictionary. (1981) Springfield, Mass. : G. & C. Merriam Co.

Webster's Dictionary and Thesaurus (1988) N. Y. : Books Essentials Publications.

Weekly, Ernest (1924) A Concise Etymological Dictionary of Modern English. London : John Murray.

Yule, Henry & A. C. Brunell (1990 : भारतीय आवृत्ती) Hobson-Jobson. Calcutta : Rupa & Co. (प्र. आवृत्ती १८८६: दु. आवृत्तीः १९०२, संपा. : William Crook)

**मराठी**

चुनेकर, सु.रा. (१९७६) ''कोशवाङमय''. मराठी विश्वकोश, खंड ४. मुंबईः म.रा. साहित्य संस्कृति मंडळ. पृ. ३७२-७४.

टिकेकर, अरुण (१९९६) ''मराठी कोश-वाङमयाची निर्मिती का रोडावली?'' लोकसत्ता. रविवार, ८ सप्टेंबर, १९९६.

मालशे, मिलिंद स. (१९९५) आधुनिक भाषाविज्ञानः सिद्धांत आणि उपयोजन. मुंबईः लोकवाङमयगृह आणि राज्य मराठी विकास संस्था.

रेगे, मे. पुं (१९९६) ''मराठी भाषेची चिरेबंद मांडणी'' महाराष्ट्र टाइम्स. रविवार, २४ मार्च १९९६.

हेमाडे, श्रीनिवास (१९९६) ''कथा विश्वकोशाची''. महाराष्ट टाइम्स. रविवार, १५व २२ सप्टेंबर १९९६.

**मानव्यविद्या आणि सामाजिक विज्ञान विभाग, आय्.आय्.टी., पवई, मुंबई ४०००७८.**



पुनर्भेट

# शिव्यागाळी

ताराबाई मोडक

('ग्राम्यतेतील सामर्थ्य' हा श्रीपाद जोशी यांचा लेख (११ : ३ पावसाळा १९९३) व 'ग्राम्यतेतील सामर्थ्याच्या निमित्ताने' हा राजाभाऊ गवांदे यांचा लेख (१४ :२ उन्हाळा १९९६) वाचल्यानंतर लक्षात आले की बालशिक्षण तज्ज्ञ चिरस्मृत ताराबाई मोडक यांनी या विषयावर सविस्तरपणे फार पूर्वी लिहिलेले आहे. (शिक्षणपत्रिका ४ :४ सप्टेंबर १९३६) अर्थात त्यांचं हे लेखन मुलांच्या संदर्भातीलच असले तरीही त्यांनी केलेला मानसशास्त्रीय विचार लक्षात घेण्यासारखा आहे. - संपादक)

'मी कध्धी नाही मारत हो. पण हा शिव्या द्यायला शिकला तेव्हा मात्र मग मारावं लागलं.' कुठून शिकला कोण जाणे? खुशाल शिव्या देत सुटला; तर ते कसं चालायचं?' एका मातेने आपल्या बाळास कां मारले त्याचे योग्य कारण सांगितले.

दुसऱ्याही अनेक मातांकडून हेच व अशाच अर्थाचे उद्गार कानी आले आहेत. एकीने म्हटले, 'काय करावं हो, शाळेत घातला तेव्हापासून आपल्या इतर मुलांकडून शिव्या शिकला आहे. शेवटी शाळेतून काढून घेतला. घरी मास्तराजवळ शिकायला बसतो आता.'

दुसरी म्हणते, 'शेजारी खेळायला जायला लागली नि आमची बेबी काय शिकली आहे म्हणता? घाणेरडं बोलायला. आपल्या मुलांच्या तोंडी असे अपशब्द ऐकले म्हणजे पित्त खवळतं अगदी.'

एक म्हणते 'मोटार चालवायची, गाडी चालवायची, हे आमच्या बाबूचे खेळ. पण काय? एक दिवस आपला तांगेवाल्यासारखे लगाम .म्हणून दोन दोऱ्या हातात घेतल्या नि लागला की, शिव्यांची लाखोळी वहायला. मग असा बदडला आहे म्हणता. साफ विसरला आहे शिवी तेव्हापासून.'

असे एक ना दोन. कित्येकांनी तीच गोष्ट निरनिराळ्या रूपात सांगितली आहे. दूर कशाला? मला स्वतःलाही आपल्या मुलांनी 'रांड' वैगरे शब्द म्हटले म्हणजे काय होते त्याचा अनुभव आहेच. सदभिरुचीस एकदम सख्त आघात बसतो. इतकी वाणीसंस्कारिता आपल्यात आली आहे हे खास. म्हणूनच आपल्या बालकांच्या तोंडी अपशब्द बसले तर ते आपल्यास असह्य होतात.

पण एक काळ असा होता व त्यास अजून कांही फार दिवस लोटले नाहीत की बहुतेक घरांतून वडील माणसांच्या तोंडी वाक्यागणिक एखादी शिवी असायचीच! व जो जो अधिक वृद्ध-अधिक माननीय अशी व्यक्ती होत जाईल तो तो शिव्यांचे प्रमाणही वाढत जाई व त्याबरोबर त्यांचा शेलकेपणाही वाढत जाई. त्या काळी सुसंस्कृत समाजाचे किंवा कुटुंबांचे शिव्या अगर अपशब्द न बोलणे हे लक्षण समजले जात नसे.

त्याचप्रमाणे हा एक पुरुष जातीचाच खास हक्क समजला जात नसे. स्त्रियांच्याही-अगदी कुलीन, घरंदाज, सन्मान्य अशा स्त्रियांच्या तोंडून चांगल्या जोडदार शिव्या अगदी मोकळेपणाने येत असत.

त्याकाळी शिव्या म्हणजे दुसऱ्याविषयीचा राग व्यक्त करण्याचे जोरदार साधनच केवळ नसे तर कौतुक, लाड, विशेष प्रेम व्यक्त करण्याचेही विनोदयुक्त साधन ते असे. कधी अर्धवट विनोदात व सकौतुक "Friend" ''मित्र'' शब्द वापरला जातो तसेच पूर्वीच्या काळी कांही शब्द भाषेत आले असतील. त्या त्या प्रकारच्या वर्तनासंबंधी समाजात जसे मत असेल तसा अर्थ त्या शब्दास येत गेला असेल. तिटकारा अथवा किळस वाटण्यापासून ते थट्टेचा विषय होण्यापर्यंत अथवा विनोद क़िंवा कौतुकापर्यंतही एकाच शब्दाच्या अर्थाचे परिवर्तन झाले असेल.

दाबलेल्या भावना प्रकट करण्याकरिताही पुष्कळदा शिव्या वापरण्यात येत असाव्या. मनुष्य नेहमीच संस्कारी व उच्च अशा कक्षेवर राहू शकत नाही. कधी कधी त्यास ग्राम्य व अश्लील असेही बोलावेसे वाटते. कारण त्या भावना पार नाहीशा झालेल्या नसतात. सभ्यता, शिष्टता, संस्कारिता वगैरेखाली त्या मनात खोल दडपल्या गेल्या असतात एवढेच. त्यामुळे पुष्कळदा संधी आल्यास माणसे अगदी खालच्या प्रतीच्या शिव्याही देताना आढळतात. त्यामध्ये रागही नसतो व विनोदही नसतो. पण स्वतःच्याच दाबलेल्या भावनांना जरा बाहेर येऊन स्वच्छ हवा देण्याचा प्रयत्न असतो.

आजच्या समाजास शिव्या नकोशा वाटल्या, अगदी असह्य वाटल्या तरी त्यास तीव्र निषेध दाखविण्यास जोरदार शब्द अथवा भाषाप्रयोग नको आहेत असे नाही.फक्त त्या काळचे शब्द व प्रयोग आजच्या नाजूक संस्कारितेस आघात पोचविणारे वाटत असल्याकारणाने आज ते आपले काम करू शकत नाहीत. अर्थात् ते निरुपयोगी आहेत. आज त्याचकामी दुसऱ्या शब्दांची योजना होत असेल. इंग्रजी किंवा फ्रेंच भाषेतील शब्द आज आपल्या कानास सह्य वाटत असतील.

आपण आजच्याच संस्कृतीत रहात असल्यामुळे, म्हणजे तीच आपल्या अंगी वावरत असल्यामुळे तिच्यात आपण वाढलो असल्यामुळे आजचीच भाषा आपणास समाधान देऊ शकेल व कित्येक शब्दांतून सध्याच्या काळी शब्दशक्ती निघून गेली असेल. तर कित्येक (out of date) अपरिचित झाले असतील. त्यामुळे पन्नास वर्षापूर्वीचे पदोपदी सहजगत्या वापरण्याचे शब्द आज आपणास नापसंत झाले असले तर त्यांस भाषेतून रजा देण्यास





अनुक्रमणिका

काहीच हरकत नाही. परंतु त्याचा अर्थ असा नव्हे की त्यांचा उपयोग कधी नव्हताच, किंवा आजही आपणास शिव्यांचा उपयोगच नाही. आजही आपण पूर्वीच्या काळच्या माणसांप्रमाणेच आहेत व आजही आपणांस शिव्यांची जरूर पडतेच. तेव्हा जुने शब्द हद्दपार केले तरी त्यांस वाईटपणाचा शेरा देऊन त्यांची आपण नालस्ती करू नये; अथवा त्यांस नीच अथवा हलके समजून आपण स्वतः ते वापरीत नाही म्हणून आपण काही विशेष श्रेष्ठ झालो आहोत अशी भावना ठेवण्याचे प्रयोजन नाही. आपण शिष्ट समजल्या गेलेल्या शब्दांत शिव्या दिल्या तरी शिव्या देण्याची वृत्ती आपणांतून गेली आहे असे नाही. त्याचप्रमाणे मनापासून तिटकारा अथवा निषेध दाखविण्याची आपणांस जरूर पडत नाही. असेही नाही. तेव्हा शिव्यांना बहिष्कार घातला तरी त्यासंबंधी आपण अतिशय अनुदार वृत्ती ठेवण्याची गरज नाही. आमच्या आजाने अत्यंत प्रेमाने, अत्यंत उमाळ्याने आम्हाला-आपल्याच मुलीच्या मुलांना 'हत् रांडीच्यांनो' म्हणून संबोधिलेले मला अजून चांगले स्मरते आहे व त्यावेळी आमच्या अंगावर सभ्यताक्षिती झाल्याचे शहारे न येता आजीच्या प्रेमाच्या उर्मीने उठलेल्या प्रतिउर्मीच जागृत झालेल्या आठवतात. त्यावेळी अर्थात् आजीने आम्हाला काय म्हटले त्याचा अर्थ कळला नव्हता. पण आजीच्या चेहऱ्यावरील भाव व तिच्या आवाजातील प्रेमळपणा एवढाच आमच्या हृदयापर्यंत पोचला होता.

त्याचप्रमाणे पुष्कळदा तर शिव्या संबोधन किंवा विशेषण म्हणून नसत. त्या प्रेम किंवा रोष यांच्या दिग्दर्शकही नसून भाषेला दुजोरा रूपाने केवळ उद्‌गारवाचक शब्द-केवळ प्रयोगी अव्यये म्हणून त्या वापरल्या जात. त्यात कधी आश्चर्य, कधी आनंद, कधी दुःख कधी राग तर कधी काहीच नाही. एक जिभेची सवय असे अनेक प्रकार असत.

अलीकडे अलीकडे मात्र सुसंस्कृत व सुशिक्षित कुटुंबातून शिव्या जात चालल्या आहेत. शिव्या हे अशिक्षित, खालच्या व खेडवळ वर्गाचे लक्षण समजले जाते. पुष्कळदा संस्कारी आईबापांना मुलांनी शिव्या दिलेल्या ऐकून संताप येतो तो आपल्या मुलांच्या वाणीत अस्वच्छता आली व त्या भाषादोषाचे मागे थोडी फार मनाची दूषितता असण्याचा अथवा येण्याचा संभव आहे म्हणून नसतो पण आपली मुले असे बोलली तर ती अशिक्षितांसारखी दिसतील - आपल्या संस्कारित (refined व cultured) वर्गात ती मोडली जाणार नाहीत म्हणून राग येत असतो. तेव्हा आता भाषा व भाषेचे उच्चार, शब्दप्रयोग अथवा वाक्यप्रयोग हे जसे उच्चनीच वर्गाचे (Classes) निराळे समजले जातात तसेच शिव्या न देणे हा प्रकारही वर्गनिदर्शक होऊन बसला आहे.

साधारणपणे शिव्यांना कोणी चांगले तर समजतच नाही; त्याचप्रमाणे मुलांनी त्या शिकू नयेत, कानी आल्याच तरी स्वतःत्या बोलू नयेत या संबंधीही फारसे दुमत नाहीच फक्त त्या मुलांच्या भाषेत येऊ नयेत म्हणून जी उपाययोजना होते त्या संबंधीच थोडा विचार करण्यापूर्वी आपण दोन गोष्टींचा विचार करू या. प्रथम भाषेत शिव्या कशा व कां आल्या असाव्या व दुसरे म्हणजे मुले शिव्या वापरतात त्या कोणत्या हेतूने - कोणत्या बुद्धीने ते पाहू.

मी भाषाशास्त्री नसल्यामुळे ऐतिहासिक दृष्ट्या शिव्यांचा भाषाप्रवेश केव्हा झाला वगैरे अधिकारयुक्त रीतीने सांगू शकणार नाही. परंतु सामान्यतः शिव्यांचे प्रकार व त्यांचे अर्थ पाहिले तर काही गोष्टी मानसशास्त्रदृष्ट्या स्पष्ट दिसतात. शिव्यांचा मोठा व अत्यंत प्रचलित प्रकार म्हणजे स्त्रीपुरुष संबंधास उद्देशून आहे. आईबहिणी वगैरेशी संबंध असणे अथवा विवाहबाह्य संबंध असणे. यावरून बहुतेक शिव्या आल्या आहेत. मनुष्य पाशवी जीवनातून उत्क्रांत होत होत जेव्हा निरनिराळ्या प्रकारच्या विवाहसंस्था अस्तित्वात आल्या असतील त्यावेळी विवाह संस्थेस आघात पोचविणारे संबंध अर्थात् त्याज्य, नीतिबाह्य, धर्मबाह्य गर्हणीय इत्यादि समजले जात असणार व त्या काळी सामाजिक सभ्यता तशीच. भाषेची सभ्यता व सभ्यतेचा नाजूकपणा वगैरे गोष्टी इतक्या सूक्ष्म झाल्या नसल्यामुळे कोणाचेही नियमबाह्य वर्तन सरळ सरळ त्याच शब्दांत व्यक्त केले जात असेल. त्याचप्रमाणे संक्रमण काळात तशी नियमबाह्य अथवा नीतिबाह्य वर्तने. ही बरीच होत असावीत व त्यांचा शिव्यांच्या रूपाने निषेध केला जात असेल. सध्याच्या काळात साधारणपणे आईशी, कन्येशी अथवा सख्ख्या बहिणीशी संबंध असणे सामान्य जनतेस तर जवळ जवळ कल्पनातीतच वाटेल. अलीकडे फार सूक्ष्म असे मानसपृथक्करण करून सध्याचे मानसशास्त्रज्ञ आपणास सांगतात की आई-मुलगा, बाप-मुलगी, वगैरे संबंध प्रत्यक्ष वर्तनांत जरी बहुतांशी बंद झाले असले तरी त्या प्रकारचे मानसिक वळण अगदी सुसंस्कृत, नीतिमान व पापभीरू अशा समाजातूनही पार नाहीसे झाले नाही. त्याचप्रमाणे अति आधुनिक म्हणविणारे कोणी कोणी ''त्यात काय वाईट आहे?'' असेही म्हणतात. असे जरी असले तरी सामान्य जनतेच्या भावना आज मात्रागमन वगैरे प्रकारास चांगले समजत नाही. इतकेच नव्हे तर असे म्हटले पाहिजे की, सामान्यतः मनुष्य आज इतका उत्क्रांत झाला आहे, की असे संबंध फारच क्वचित दिसतात. व ते समाजास मनापासून किळसवाणे वाटतात. परंतु इतर विवाहबाह्य संबंधाविषयी असे म्हणता येणार नाही. सामान्यतः ते खराब समजले जात असले तरी त्यासंबंधी समाजात थोडी डोळेझाक असते. थोडी सहानुभूतिही असते म्हटले तरी चालेल. थोडी घृणा असते व कधी कधी रसिकतेची छाया व छुपे कौतूकही दिसून येते. परंतु हे सर्व गुप्त असते. उघडपणे या गोष्टी वाईट व म्हणून त्याज्यच गणल्या गेल्या पाहिजेत असा समाजाचा पूर्ण आग्रह असतो. सारांश, खरा राग अथवा तिटकारा दाखविणे व गुप्त कौतुक दाखविणे या दोनी प्रकारांमुळे शिव्या भाषेत आल्या असाव्यात. खरोखर न आवडणारी गोष्ट-घाणेरडी वाटणारी गोष्ट अशी आहे हे जोरदारपणे व्यक्त करणे हा पहिला प्रकार. पुष्कळदा एकादी गोष्ट अगदी स्पष्ट सांगण्याइतका दुसरा अधिक जोरदार शब्दच नसतो. उदाहरणार्थ, आईवरून अथवा बहिणीवरून ज्या सर्व शिव्या आल्या आहेत त्यांच्याइतका तशा प्रकारांसंबंधी तिटकारा व त्वेष व्यक्त करण्यास दुसरा शब्द मिळावयाचा नाही. तसेच अगदी तोच प्रकार नसला तरी तितकाच निंद्य अथवा घाणेरडा प्रकार आहे असे दाखविण्यासाठीही कदाचित् तेच शब्द वापरण्याचा प्रघात पडला असावा. बहुतेक आईवरूनच्या शिव्या कोणी विनोदाने वापरीत नाहीत असा माझा समज आहे. त्या बाबतीत

खरा राग व खरा तिटकाराच असल्यामुळे रागाने शिवी देताच बहुतेक त्यां शिव्या येतात असे वाटते. (शिव्या व त्यांच्या प्रदेशाचा फारसा परिचय नसल्याने मी माझी विधाने थोडी भीत भीतच करीत आहे.) त्यांच्यापेक्षा दुय्यम दरज्याच्या म्हणजे कमी तिखट, कमी जहाल अशा दुसऱ्याही शिव्या राग अथवा तिटकारा व्यक्त करण्यास वापरण्यात येतातच.

दुसरा प्रकार म्हणजे वरवर तिटकारा दाखवीत असताही गुप्त सहानुभूती अथवा कौतुक वगैरे जे काही वाटत असते ते व्यक्त करणे. त्याकरिता मला वाटते, लाडाने प्रेमाने व विनोदाने शिव्या वापरण्याचा प्रघात पडला असावा. सध्याच्या आधुनिक व प्रागतिक समजल्या जाणाऱ्या तरुण समाजात त्यांना कधी स्थान नाही. त्यांचं ह्या मानव जीवनात योग्य स्थान होते व अद्यापही आहेच हे लक्षात असू द्यावे.

आता मुले शिव्या का शिकतात व का वापरतात याचे थोडे पृथक्करण करू या.

शिव्यांचा जो मूळ उद्देश की एखाद्या गोष्टीचा तीव्र निषेध करावयाचा अथवा कोणा व्यक्तिपरत्वाचा आपला राग व तिटकारा व्यक्त करावयाचा तोच मुलांचाही उद्देश असू शकतो. त्यांनाही पुष्कळ गोष्टींचा निषेध करावयास हवा असतो. त्यांनाही पुष्कळांचा राग येत असतो व तो व्यक्त करता येत नसल्यामुळे त्यांच्या भावना आतल्या आत उसळून त्यांच्या मनाला त्यांचा त्रास आपल्या मोठ्यांच्या प्रमाणेच होतो. उलट आपल्यामध्ये वयोमानाने व अनुभवाने समजूत आलेली असते; राग व्यक्त करून काय मिळणार आहे असे म्हणून आपण गप्प रहाण्यास मनास शिकवू शकतो; आपला राग अगर क्रोध जिंकण्याचा जर आपण प्रयत्न केला असला, आपल्या तितका मनःसंयम मिळावला असला तर आपल्या मनास शिव्या देऊन आपला राग व्यक्त करण्याची जरूरी रहात नाही. परंतु बालकांची स्थिती प्राथमिक मनुष्यासारखी (Primitive) असते. त्यांना त्यांचे राग द्वेष आवरणे कठीण जाते. त्यांच्यात अद्याप आवेश जास्त असतो. त्याच्या जोडीस संयम आलेला नसतो. संयम ही एका दिवसात उपदेशाने शिकावयाची गोष्ट नसून वर्षानुवर्ष सतत व योग्य प्रयत्नाने साध्य करून घेण्याची गोष्ट आहे. तेव्हा त्यांनी कधी रागाने शिव्या दिल्या तर ते पुष्कळांशी क्षम्य असते. इतकेच नव्हे तर ते पुष्कळदा बालकांच्या प्रकृतीच्या दृष्टीने हितावहही असते म्हटले तर चालेल. शिव्या अश्लील असतात अथवा हलक्या असतात ही गोष्ट त्यांना माहीतही नसते. त्यांना त्यांची जरूर राग व्यक्त करायला एक साधन एवढ्यापुरतीच असते. त्यांना अगदी अर्थ नसलेले कानडी किंवा लॅटिन किंवा जर्मन भाषेतले चार शब्द शिकवले तरी त्यांचे काम भागेल. गद्धा, चोर, पाजी म्हटले काय नी फ्रस्टो क्रस्टो शिनूर की असे काही म्हटले तरी त्यांच्या आवेशाला जोराने बाहेर येण्यास वाव मिळाला म्हणजे झाले. तेव्हा अगदी शिव्या देण्याच्या उद्देशाने जरी त्यांनी शिव्या वापरल्या तरीही लहान मुलांच्या बाबतीत आपण संतापून चिडून जाण्यासारखा प्रकार झाला आहे असे मानण्याचे कारण नाही. कारण त्या शिव्यांच्या मागे मनाचा गलिच्छपणा नसून नुसता ताब्यात न रहाणारा असा त्यांचा आवेशच काय तो असतो.

या शिवाय 'करू नये' 'बोलू नये' म्हणून वर्ज्य केलेही गोष्ट मुद्दाम करून पहाण्याची

मानववृत्ती ख्रिस्ती लोकांच्या धर्मशास्त्रात ॲडम व इव्ह यांच्या गोष्टीत स्पष्ट झालेलीच आहे. संबंध जागेत अनेक फळे फुले असतांना ज्या झाडाचे फळ खाऊ नको म्हणून ईश्वराची आज्ञा होती तेच खाण्याची इच्छा इव्हला झाली. त्याप्रमाणे मुले शिव्या बोलली की, मोठी माणसे 'असले घाणेरटे बोलायचे नाही' म्हणून डोळे वटारून सांगतात व त्यामुळे ते शब्द कोणी ऐकणार नाही अशा रीतीने वारंवार बोलण्याची इच्छा पुष्कळ मुलांना होत असल्यास नवल नाही. मला माझे स्वतःचे एक उदाहरण आठवते. एखादा शब्द त्यांचं काम भागेल असा द्यावा. उदाहरणार्थ, तांगेवाल्याचे शब्द ऐकून तीन चार वर्षांचे मूल जर ते बोलत असले तर त्यास तांगेवाल्याचेच 'ए बाजू, ए छोकरा बाजू हटो' वगैरे दुसरे शब्द बोलावयास सांगावे. अथवा ते त्यास पुरते जोरदार वाटले नाहीत तर दुसरे काही शब्द सांगावे. तसेच त्यांचा राग व्यक्त करण्यास त्यांनी गाढव, गद्धा, बैल, घोडा, कुतरा वगैरे काही शब्द वापरले तर वापरू द्यावेत.

मलिनतेच्या भावनेने मोठ्या माणसांत नकळत गुप्तपणाने घाणेरडे शब्द बोलणे वगैरे जे प्रकार आहेत त्याला आपले वातावरण सामान्यतः स्वच्छ ठेवणे व ते वातावरण मुलांवर रागाने जोरजुलमाने न लादता त्याचीच त्यांना गोडी लागेल-तेच त्यांना आवडू लागेल असे करणे हाच उपाय होय. जसे घरात स्वच्छपणे राहण्याची रीत असली तरी लहान मुलांस मातीत, चिखलात, घाणीत खेळायची इच्छा ही होतेच, पण हळू हळू त्यांना घाणीची किळीस वाटू लागते व स्वच्छतेची आवड उत्पन्न होते. तसेच वाणीची स्वच्छता ठेवली जाते. गोड भाषा घरांत वापरीत रहावे हाच उपाय आहे. मलिनतेची आवड काही स्वाभाविक नाही. सामान्यतः इतर काही कारणाने भावना दडपल्या गेल्या नसतील, कुचंबणा होत नसेल तर ती मलिनता सहज निघून जाणारीच गोष्ट असते. तेव्हा त्याबाबतीतही फार घाबरून, फार लक्ष देऊन, फार चिकित्सा करू नये. चांगल्या भाषेकडे मूल वळले म्हणजे वाईट भाषा आपोआप सुटेल अशी श्रद्धा ठेवावी.

सारांश, शिव्यागाळीसंबंधीही खोल विचार करून वागण्यासारखी ती गोष्ट आहे. नुसते रागवून मारून त्याचा खरा उपाय होत नाही. उलट पुष्कळदा मुलांना त्या कायमच्या शिकविण्याचे मात्र श्रेय येते. लहान असताना मी आजीचा पाढा केला होता. आजी एके आजी; आजी दुनी दाजी; आजी त्रीक ताजी; वगैरे. त्यात शक्य तोवर दुनी ला दाजी, त्रीक ला ताजी, म्हणजे त्याच अक्षराने सुरू होणारा शब्द ठेवायचा होता म्हणून 'आजी पाच पाजी' असे मी केले होते. 'पाजी' हा शब्द मी ऐकलेला होता व प-ला-प मिळाला म्हणून तो तेथें लावून दिला होता. त्यामुळे आजीना काही शिवी दिल्यासारखी होते वगैरे कल्पनाही नव्हती. परंतु मोठ्या मंडळींना ते असह्य वाटले. 'ए असं काय म्हणतेस' असलं नाही बोलायचं' असे त्यांनी मला नीती व संस्काराचे शिक्षण दिले. त्यावेळी अर्थात् माझी कविता बिघडते; चांगला सुटसुटीत व पा ला पा जुळणारा शब्द असूनही आपल्याला तो सोडून द्यावा लागतो याचे तर वाईट वाटलेच. पण तो एक न वापरण्यासारखा शब्द आपल्याला कळला याचा काही एक प्रकारचा गुप्त आनंद व्हावा तसाही मला झाला; व कोणी ऐकत नाही असे पाहून

मी स्वतःशीच पण मोठ्याने 'आजी पांच पाजी' असे म्हणत असे. कधी कधी नुसतेच 'पाजी रे पाजी' असेही बडबडायचा; व तसे करण्यात मला एक प्रकारचा आनंद वाटत असे मला मला स्मरते. मला वाटते तो आनंद करू नये ती गोष्ट करण्याचा (The delight of doing forbidden thing) असावा अथवा वाईट गोष्ट करण्याचाही असेल, अथवा त्यात न बोलण्यासारखे काय आहे ते बोलून पहावे अशीही वृत्ती असण्याचा संभव आहे. व याचप्रमाणे इतर मुले अशा वृत्तीने शिव्या बोलत असतील ('देत असतील' असे मुद्दाम म्हणत नाही. कारण ती कदाचित शिव्या नुसत्या उच्चारूनच पहात असतील) हे संभवित आहे.

याशिवाय मोठी माणसे बोलतात म्हणून त्यांचे केवळ अनुकरण म्हणूनच पुष्कळशी मुले शिव्यागाळी बोलत असतात. खालच्या अशिक्षित वर्गातील मुलांच्या तोंडी खूप शिव्या असतात याचे कारण हेच असते. घरात उठता बसता शब्दागणिक शिव्या ऐकावयाची सवय झाली असल्यामुळे केवळ अनुकरण म्हणून मुलेही तसेच बोलू लागतात. त्यांना शिव्यांचा अर्थही माहीत नसतो व शिव्या देण्याचा भावही नसतो. आपली मुले पुष्कळदा अशा नोकरांच्या मुलांच्या किंवा इतराच्या सहवासात आल्याने तशाच शिव्या वगैरे बोलू लागतात. ''अडगुलं मडगुलं'' सारखे अर्थहीन बाळगीत म्हणणे व ते शब्द उच्चारणे यात फारसा फरक नसतो.

चौथा प्रकार म्हणजे जो मोठ्यात असतो तशाच प्रकारचा थोडा मलिनतेचा असू शकेल. मुलांना प्रत्येक शिवीचा अर्थ कळला नाही तरी पुष्कळ मुलांना त्यात कोणत्या तरी प्रकारची मलिनता आहे व म्हणून मोठी माणसे आपल्याला तसे बोलू देत नाहीत एवढे कळते. सहा सात वर्षाच्या वयास हे कळावयास लागते. मोठी माणसे थट्टेने अथवा कौतुकाने शिव्या देतात त्यातही काही विशेष प्रकारचा आनंद आहे हे त्यांना कळते. काय आहे ते स्पष्ट समजत नसले तरी काही तरी गुप्त प्रकारची मलिनता आहे व ती दुसऱ्यांस न दिसू देता मनात संग्रहण्यास हरकत नाही असा कांहीसा भास त्यांना होत असतो. अशी मुले मोठ्या माणसांच्या देखत शिव्या बोलत नाहीत. उलट शिष्टपणाचा आव आणून दुसरी कोणी बोलली तर तिरस्कार दाखवितात. पण असतील तेव्हा विशेष आवडीने गलिच्छ शब्द बोलताना ती अढळतात.

आपली मुले शिव्या बोलू लागली अथवा देऊ लागली म्हणजे आपण काय करावे या प्रश्नाचे उत्तर देणे या सर्व गोष्टींचा विचार केल्यावर बरेच सुलभ होते.

वरील मीमांसेवरून सहज दिसून येईल की मुलांनी शिव्या दिल्या की त्यांस सपाटून मारण्याची अथवा रागे भरण्याची अथवा आपण स्वतःअत्यंत अस्वस्थ होण्याची काहीच जरूर नाही. मुलांच्या जवळ हे शब्द कोठून आले व ती ते काय हेतूने वापरीत आहेत ते तपासून पहाणे हेच पहिले काम केले पाहिजे; व सामान्यतः मुलांनी मोकळेपणाने आपल्याशी बोलायची नेहमीची वहिवाट असली तर या सर्व गोष्टींचा पत्ता चट्कन लागतो. मुलांच्या मनात सामान्यतः गोष्टी फार खोल अशा दडवून ठेवलेल्या नसतात. एकदा मुळाचा





अनुक्रमणिका

पत्ता लागला म्हणजे उपाययोजनाही करिता येते.

उपाययोजनेत पहिली गोष्ट म्हणजे चिडणे, रागवणे, मारणे या गोष्टी मुळीच उपयोगाच्या नाहीत. आपण कदाचित् त्या आपल्या नाजूक सभ्यतेस धक्का बसल्यामुळे आपल्यात जागृत झालेल्या पुण्यप्रकोपाने (righteous indignation) करीत असलो तरी तो प्रकोप असायला हवा. शिव्यांच्या विरूद्ध त्याऐवजी बिचाऱ्या निर्व्याज (innocent) बालकांवर तो उतरतो; व त्यामुळे हित होण्याचा संबंध तर नसतोच परंतु एखादे वेळी गंभीर अहित होण्याचा संभव मात्र पुष्कळ असतो.

अशावेळी चिडले नाही, संतापला नाही किंवा मारले नाही म्हणजे आपले कर्तव्य संपते असेही म्हणता येणार नाही. मुलांची बाजू समजून घ्यावी हे ठीक आहे. पण त्याबरोबरच त्यांना संस्कारितेचे वळण लावण्याची जबाबदारीही आपल्यावरच आहे. त्यांनी जसे शरीराने स्वच्छ रहावे हे पहाणे आपले काम आहे, तसेच त्यांच्यात वाणीची स्वच्छता-संस्कारिता यावी हेही आपण पाहिले पाहिजे.

त्याकरिता प्रथम तर आपण आपले वातावरण तपासले पाहिजे व आपल्याच कडून त्यांस हे शिक्षण मिळत असले तर सुधारणा आपल्या पासूनच केली पाहिजे.

आपल्या बाहेरचे वातावरण काही नेहमीच आपल्या ताब्यात नसते व आपल्या घराबाहेरचे तर मुळीच नसते; व बाहेर असे हे वातावरण आहे म्हणून मुलांना कोठेही जाऊ न देणे हाही उपाय योग्य नसतो. त्यास उपाय म्हणजे नेहमीच्या जगात रहात असूनही आपल्या घरची वागण्याची बोलण्याची वगैरे विशिष्ट पद्धत असली तर मुलात तीच येते. तेव्हा आपली बोलण्याची पद्धत शुद्ध ठेवली असता सामान्यतः मुलांची तशीच रहाते. त्यांतून बाहेरून असे तसे काही शब्द आलेच तर 'शी हे अस काय म्हणायचं? ते चांगलं नाही लागत. ते गोड नाही वाटत; छान नाही वाटत; वाईट लागतं.' असे वेळ आली असता सांगावे. मूल अगदीच लहान म्हणजे पाचाच्या आतले असले तर 'असं नाही; असं, असं म्हणायच' असे म्हणून त्या ऐवजी दुसरा सौम्य पर्याय त्याला सांगावा.

❑❑

---

## केशवसुत आणि इंग्रजी

मुंबई विद्यापीठाच्या पहिल्या पर्वातल्या इंग्रजी माहात्म्याचा एक मासला. मॅट्रिक ही तेव्हाची शालान्त परीक्षा. तिचे इंग्रजीचे पेपर अगोदर तपासले जात. त्यात जे नापास, त्यांचे अन्य विषयांचे पेपर तपासलेही जात नसत. याचा फटका केशवसुतांना एकदा (की दोनदा) बसला. केशवसुतांची काही इंग्रजी पत्रे उपलब्ध आहेत. ती पाहिली की याचे आश्चर्य वाटते. इतके ते इंग्रजी चांगले आहे. इंग्रजीतली पदवी मिळवलेल्या अनेकांहून चांगले!

**(प्रा. मं. वि. राजाध्यक्ष, भाषाविवेक, श्री विद्या प्रकाशन, पुणे १९९७ पृ. २५)**

# साहित्याशी मैत्रीच्या वाटेवर

**वर्षा सहस्रबुद्धे**

'अक्षर-नंदन' या पुण्यातील शाळेत अन्य विषयांबरोबरच भाषाशिक्षण-विषयक प्रयोग गेली चार वर्षे सुरू आहेत. जगण्याचा अर्थपूर्ण जिवंत भाग म्हणून मुलांनी भाषा शिकावी केवळ तांत्रिकपणे शिकू नये या दृष्टिकोनातून बालवाडीपासूनच येथे धडपड केली जाते. जी.ए. कुलकर्णी यांच्या 'बिम्म' नें मला पहिल्या वाचनातच मोहून टाकलं होतं. नंतर मुलीला बिम्मच्या गोष्टी वाचून दाखवताना गोष्टीचा एकेक पदर नव्यानंच आपल्यापुढे उलगडत असल्याचंही अनुभवलं.

'अक्षर नंदन' मध्ये तिसरीच्या मुलांना त्यांची एक कथा आस्वाद- पाठासाठी वाचून दाखवायची असं ठरवलं. त्यांच्या 'बखर बिम्मची' या पुस्तकातून 'पाऊस' ही कथा वाचून दाखवली.

जी.ए. शब्द कसे वेगळ्याच प्रकारानं वापरतात, नवे शब्द कसे तयार करतात याची उदाहरणं दिली. आईचा आवाज ऊबकापूस झाला', 'बिम्मच्या खिशात चघळायला खूप असल्यामुळे त्याला आज श्रीमंत वाटत होतं' बिम्मच्या मनावर समाधानाची साय पसरली होती.' या वाक्यांमधल्या शब्दांबद्दल, त्यांच्या अर्थांबद्दल बोलतं करून मुलांना त्यांचा feel यावा असा प्रयत्न केला. ऊब आणि कापूस या शब्दांच्या मदतीनं मुलांनी अर्थ उकलला. तो आईशी नेऊन भिडवला. साय दुधाला कशी झाकून टाकते, दुधावर सगळ्याभर पसरते तसं समाधान पसरलं होतं हेही मुलांच्याच बोलण्यामधून स्पष्ट करत नेलं. आपल्याकडे पैसे नसतानाही कशाकशामुळे श्रीमंत वाटू शकतं याबद्दल गप्पा मारल्या. गोष्ट वाचायला सुरुवात केली आणि काही क्षणातच सगळी मुलं गोष्टीकडे खेचली गेली. एरवी वर्गात ज्यांची चलबिचल सुरू असते त्यांच्याही मनात बिम्म शिरला असल्याचं त्यांच्या बसण्यातून, डोळ्यांमधून माझ्यापर्यंत पोचत होतं. हात वर करून मगच बोलणयाचा आग्रह धरला तरी मुलांच्या काही प्रतिक्रिया अनावर होत होत्या. अनवधानानं बोलून जाणाऱ्या मुलांचंही बोलणं गोष्टीतल्या घटनांना धरून होतं, गोष्टीमधून मुलांचं भावविश्व, त्यांची भाषा, त्यांची एकमेकांशी असलेली नाती, विलक्षण कल्पनाविश्व या सगळ्यापैकी काही ना काही वाक्यागणिक मुलांपर्यंत पोचत होतं.

वाचताना अधल्यामधल्या शब्दांबद्दल मुलाशीं बोलत राहिले. त्या शब्दांच्या पोटातल्या अर्थाशी, चित्रांशी, पोताशी मुलांनी पोचावं असा प्रयत्न करत राहिले. भगभगीत ऊन, झळझळीत ऊन, काळवंडणे, अंधारणे, थेंब मातीत पडल्यावर वाफेची पिसं होणे.. कितीतरी शब्द! त्यांच्याविषयी बोलताना गोष्टीच्या ओघाला बाधा येणार नाही, मात्र

आकलनाला मदत होईल इतपतच अर्थ उलगडून दाखवायचा कटाक्ष ठेवला.

मुलांना गोष्ट किती आवडली हे पुढच्या तासाला आणखी कळलं. कविता शिकवून न देता त्यांनी बिम्मलाच परत बोलावलं. साहित्याच्या सकसपणाला अशी दाद मिळाली.

साहित्यातल्या व्यक्तिरेखेशी वेगळ्याच प्रकारे नातं जुळण्याचा अनुभव सात-आठ वर्षांची मुलं घेतात. एवढंच नव्हे तर ते त्यांच्या वयाजोगत्या भाषेत नीटसपणे व्यक्तही करतात हे अनुभवताना मला शिक्षक म्हणून खूप काही मिळालं.

ज्या वर्गात ही गोष्ट वाचून दाखवली त्या वर्गाला गेली चार वर्षं चांगल्या कथा, कविता, उतारे वाचून दाखवले गेले आहेत. त्यातून घडत जाणाऱ्या आस्वाद क्षमतेचे आविष्कार अगदी मूर्त स्वरूपात दिसू लागले आहेत.

गृहपाठ म्हणून मुलांनी बिम्मला पत्रं लिहिली. त्यातल्या काही पत्रांमधला वेचक मजकूर असा :

''काल आम्हाला वर्षाताईंनी तुझी गोष्ट वाचून दाखवली. ती आम्हाला खूप आवडली. मे महिन्यामधे उकाड्यानं हैराण झालो की मलासुद्धा पावसाला पत्र लिहावंसं वाटतं. पुन्हा पुढच्या गोष्टीत भेटूच.'' सनातन

''तू शाळेत जातोस का? कितवीत आहेस? मी तिसरीत आहे. तुमच्या शेजारी कोण राहतं?

मी पत्राच्या उत्तराची वाट बघत आहे.''

- सुनृता

तुझ्या पुस्तकाचे नाव 'बखर बिम्मची' असे का दिले आहे?'' चारुदत्त.

''मला तुझी गोष्ट खूप आवडली. चंद्री पहिलवान मस्त पडली.'' - संग्राम

''त्या मुली चिडवतात ना ते आम्हाला फार आवडलं'' - वैदेही.

''तू माझ्या घरी येशील? आपण दोघे खूप मजा करू. तू माझ्या घरी आलास ना, की मी तुला चघळायला खूप काय काय देईन.'' - कल्पक

''तुझा वाढदिवस कधी आहे?'' - चिन्मय.

''बिम्म, तू आणि तुझ्या सगळ्या मैत्रिणी अक्षरनंदनमधे याल का?'' - गीता

''तुझ्या काळुराम ढगाला सांग की आमच्या घरावर मोठा पाऊस पाड. आम्ही बरेच दिवसात भिजलो नाही आणि आमच्या होड्यांसाठी मस्त समुद्र करायला सांग. आणि बळीचा समुद्र छोटा असू दे. तिच्या होड्या बुडू दे. तिच्या मैत्रिणींना चांगलं चिखलात सटकू दे.''- श्रीयांस

''तुझी गोष्ट मला आवडली. मला पण ढगाला पत्र पाठवता आलं तर किती मजा येईल!

मला तुझी गोष्ट परत एकदा ऐकावीशी वाटते?'' पीयूषा

संदर्भ - 'बखर बिम्मची', जी.ए.कुलकर्णी, परचुरे प्रकाशन

**१२९४ शुक्रवार पेठ, पुणे ४११००२**







अनुक्रमणिका

# खानदेशातील बोली आणि बहिणाबाई चौधरींची काव्यभाषा

डॉ.कैलास सार्वेकर

धुळे आणि जळगाव जिल्ह्यांचा परिसर खानदेश विभाग म्हणून ओळखला जातो. भौगोलिक परिसर लक्षात घेता अहिराणी, लेवा आणि आदिवासी या तीन बोली खानदेशातील अधिक भागात प्रचलित असलेल्या दिसतात. शिवाय जातिपरत्वेही काही वेगळ्या बोली अस्तित्वात आहेत.

अहिराणी बोली खानदेशातील सर्वाधिक भूभागावर बोलली जाते. खानदेशा-व्यतिरिक्त नाशिक जिल्ह्यातील बागलाण परिसरातही अहिराणी बोली प्रचलित आहे. धुळे-अमळनेर परिसरात बोलली जाणारी मध्यवर्ती अहिराणी, नंदुरबार परिसरातील नंदुरबारी अहिराणी व बागलाण परिसरातील बागलाण अहिराणी असे अहिराणीचे तीन प्रकार दिसून येतात. आभीरांच्या वास्तव्याचा भाग तो अहिराण आणि अहिराणी भागात (पट्टीत) बोलली जाते ती अहिराणी, तसेच बागुल बागलाण बागलाणी, नंदुरबार नंदुरबारी अशी अहिराणी बोलींची नामव्युत्पत्ती सांगितली जाते. मध्यवर्ती अहिराणी पश्चिम खानदेशातील(धुळे जिल्ह्यातील) धुळे, साक्री, शिरपूर आणि पूर्व खानदेशातील(जळगाव जिल्ह्यातील) अमळनेर, पारोळा, चाळीसगाव, एरंडोल, पाचोरा, चोपडा इ. तालुक्यात बोलली जाते. नदुरबारी अहिराणी-धुळे जिल्ह्यातील नंदुरबार, शिंदखेडा, शहादा, तळोदा, नवापूर, अक्कलकुवा या परिसरात तर बागलाणी अहिराणी-नाशिक जिल्ह्यातील कळवण, मालेगांव, बागलाण, नांदगांव, चांदवड, व सुरगाणा इत्यादी तालुक्यात बोलली जाते.

लेवा बोली- पूर्व खानदेशातील (जळगांव जिल्ह्यातील) जळगांव, यावल, रावेर, भुसावळ, एदलाबाद, जामनेर इ. तालुक्यात बोलली जाते. शिवाय वऱ्हाडातील मलकापूर, नांदुरा, बुलढाणा या भागातही (काही प्रमाणात) ही बोली प्रचलित आहे.

खानदेशातील सातपुडा, सातमाळा डोंगर प्रदेशात संख्येच्या दृष्टीने उपरोक्त दोन बोलींच्या खालोखाल आदिवासी समाज राहतो.या बोलीमध्येही जमाती परत्वे, मावची बसावे, कोकणी, पावरा इ. बोली बोलल्या जातात. पैकी मावची व बसावे बोली नवापूर नंदुरबार,तळोदा, अक्कलकुवा इ. परिसरात; कोकणी बोली- साक्री, नंदुरबार, तळोदा, अक्कलकुवा इ. तालुक्यात तर पावरा बोली धुळे जिल्ह्यातील शहादा शिरपूर व जळगांव

जिल्ह्यातील चोपडा, रावेर तालुक्याचा डोंगराळ प्रदेशातील पावरा जमातीत बोलली जाते. खानदेशातील या प्रमुख बोली, त्यांचे प्रकार आणि त्यांचा भूभाग एका दृष्टिक्षेपात लक्षात यावा या दृष्टीने आकृतीच्या सहाय्याने पुढील प्रमाने दाखविता येईल.




या शिवाय गुजर, लाड- लाडशिक्की, तावडी,नेमाडी बोली खानदेशात जातिपरत्वे बोलल्या जातात. अर्थात त्या त्या जातीच्या कुटुंबात बोलल्या जाणाऱ्या या बोलीवरही त्या गावातील प्रमुख बोलींचा परिणाम जाणवतो. उदा.गुजर,लाड इ. गुजराती व अहिराणी सदृश बोली आहेत. नेमाडी ही नेमाड प्रदेशावरून बोलली जाणारी बोली खानदेशातील तांड्यावर वस्ती करून राहणाऱ्या वंजारी समाजात बोलली जाते. तर तावडी ही मुसलमानी अंमलात मुस्लिमांनी सक्तीने धर्मांतरित करून घेतलेल्या (पूर्वाश्रमीचे हिन्दू-भील) अशा लडवी जातीत बोलली जाते. हिच्यावर मुसलमानी बोलीचा प्रभाव अधिक जाणवतो.

भौगोलिक परिसर लक्षात घेता खानदेशच्या पश्चिम भागास गुजरात राज्य आहे. उत्तर भागास मध्यप्रदेश, पूर्वेस वऱ्हाड विभाग तर दक्षिणेस मराठवाडा विभाग आहे. हा सर्व सभोवतालचा परिसर लक्षात घेता असे दिसते की, गुजरातला लागून असलेल्या नंदुरबार, धुळे, बागलाण परिसरात अहिराणी बोलली जाते. तर पूर्व खानदेशातील वऱ्हाड मध्यप्रांत व मराठवाड्याला लागून असलेल्या जळगाव, भुसावळ रावेर भागात लेवा बोली अस्तित्वात आहे. तसेच खानदेशातील डोंगराळ भागात आदिवासी बोली प्रचलित आहे. स्वाभाविकच अहिराणी बोलीवर तिच्या निकटच्या गुजरातीचा तर लेवा बोलीवर मोठ्या प्रमाणात वऱ्हाडी बोलीचा प्रभाव आहे. (हा भाग पूर्वी विदर्भ प्रांतात समाविष्ट होता.) वऱ्हाडीबरोबरच हिन्दी आणि मराठवाडी बोलीचाही प्रभाव काही प्रमाणात या बोलीवर

दिसतो. आदिवासी बोलीवर अति निकटच्या अशा गुजराती, आहिराणी बोलींचा प्रभाव जाणवतो. (उदा. मावची, वसावे बोलींचे गुजरातीशी तर कोकणी बोलीचे आहिराणीशी निकटत्व जाणवते.)

अर्थात वर सांगितलेली बोलीप्रदेशांची विभागणी ही काटेकोर स्वरूपाची नाही. राजकीय नकाशात सीमारेषा अचूकपणे दाखविता येतात तशा बोली भूगोलात दाखविता येत नाहीत. अमूक एक भाषा अमूक एका ठिकाणी संपते आणि अमूक ठिकाणापासून दुसरी भाषा सुरू होते असे दाखविणे अशक्य असते. मात्र बोलीतील बदल हळू हळू झालेला दिसतो. तसेच एका भाषेचा प्रभाव तिच्या लगत बोलल्या जाणाऱ्या बोलीवर पडलेला दिसतो. इंद्रधनुष्याचे रंग जसे वेगवेगळे असले तरी एक रंग कुठे संपतो व दुसरा रंग कुठे सुरू होतो हे स्पष्ट रेषेत दिसत नाही. रंग भिन्नता मात्र स्पष्ट होत जाते. बोलींचेही काहीसे तसेच असते.

खानदेशातील अहिराणी, लेवा आणि आदिवासी बोलींमध्ये साम्य आहे. तसे ठळक भेदही आहेत. उच्चारप्रक्रिया व्याकरण आणि शब्दसंग्रह इत्यादीच्या आधारे या भाषातील साम्य भेद सोदाहरण स्पष्ट करता येण्यासारखे आहेत.

सुप्रसिद्ध कवयित्री बहिणाबाई चौधरी यांची कविता अहिराणी बोलीतील आहे. असा चुकीचा समज खानदेशाबाहेर बऱ्याच ठिकाणी पसरलेला दिसतो. अगदी भाषा विज्ञानाच्या पुस्तकातही काही ठिकाणी असा उल्लेख आढळतो. ('वर्णानात्मक भाषाविज्ञान स्वरूप आणि पद्धती ' संपाः डॉ. काळे, डॉ.सोमण पृ.१८८) वास्तविक पाहता बहिणाबाईंची कविता लेवा बोलीतील कविता आहे, हे उघड आहे. आचार्य अत्रे यांनी ''बहिणाबाईंची गाणी'' (१९५२) या संग्रहाच्या प्रस्तावनेत या बोलीचा उल्लेख खानदेशी-वऱ्हाडी असा केला आहे. लेवा बोलीवर वऱ्हाडीचा प्रभाव असल्याने ते योग्य वाटते. मात्र लेवा बोली व अहिराणी बोली यांच्यात साम्यापेक्षा भेद अधिक असल्याने व दोन्ही बोलींचे एकूण स्वरूप भिन्न असल्याने तिला अहिराणी म्हणणे योग्य ठरत नाही.

अहिराणी लोकसाहित्याचे अभ्यासक डॉ.दा.गो.बोरसे यांनी या कवितेचा समावेश लेवा बोलीत केला आहे. (अहिराणी लोकसाहित्याची वैशिष्टचे पृ.२८) सौ. ऋता पित्रे यांनी ही बहिणाबाईचे काव्य लेवा बोलीत असल्याचा निर्वाळा दिला आहे. ('बहिणाबाईची गाणी :एक अभ्यास' पृ.७८) असे बरेच ठिकाणी लेवा बोलीचे उल्लेख असूनही हा समज अद्याप मोठ्या प्रमाणात आहे. ही वस्तुस्थिती आहे.

बहिणाबाईंची कविता अहिराणी , बोलीतील कविता आहे, असा समज होण्याचे मुख्य कारण असे की खानदेशाबाहेर अहिराणी हीच केवळ खानदेशाची बोली आहे असा समज मोठ्या प्रमाणावर आहे.(वास्तविक लेवा बोलीवरही अहिराणी प्रमाणे विद्यापीठीय प्रबंध लिहिले गेले आहेत.)

अहिराणीने खानदेशाचा अधिक भूभाग व्यापला आहे. त्यामुळेही कदाचित असा समज झाला असावा. दुसरे कारण असे की कवी सुरेश, दा. गो. बोरसे, अनंतराव पाटील,

राजा महाजन, सदाशिव माळी, शं.क. कापडणीस, बी.पी. राजपूत इत्यादींनी अहिराणी बोलीचा साहित्य लेखनासाठी मोठ्या प्रमाणावर वापर केला परंतु अनेक कारणांनी यांचे साहित्य अलक्षित राहिले. तुलनेने बहिणाबाईंची कविता खूप लोकप्रिय झाली. सर्व परिचित अहिराणी भाषा आणि लोकप्रिय अशी बहिणाबाईंची कविता यांची सांगड घालण्याचा हा सहज प्रयत्नही हा समज निर्माण करण्यास कारणीभूत झाला असल्याची शक्यता आहे.

बहिणाबाईंची कविता अहिराणी नसून लेवा बोलीतली आहे. हे स्पष्ट करण्यासाठी अहिराणी व लेवा बोलीतील साम्य आणि भेद लक्षात घेणे अधिक उपयुक्त ठरेल असे वाटते. उच्चार प्रक्रिया, व्याकरण आणि शब्दसंग्रह यांच्या आधारे ते पुढीलप्रमाणे दाखविता येतील.

**उच्चार प्रक्रिया–**

साम्य- १) बहुसंख्य बोलीप्रमाणे 'ण' ऐवजी 'न' चा उच्चार होण्याची प्रक्रिया अहिराणी व लेवा दोन्ही बोलीत आढळते. उदा. पाणी - पानी, जेवण - जेवन.

२) 'ळ' बद्दल दोन्ही बोलीत 'य' येतो. उदा. केळ केय ,पळ पय.मिळते मियते.

३) शब्दारंभी येणाऱ्या 'वि' चा 'इ' उच्चार दोन्ही बोलीत होताना दिसतो. उदा. विचार - इचार, विस्तव - इस्तू

४) 'र' व्यंजना पाठोपाठ 'ड' येत असल्यास 'र' चा 'ल' असा उच्चार होतो. उदा. रड्डू - लड्डू, ओरडणे - वलडणे.

भेद- १) अहिराणी बोलीतील उच्चार प्रक्रियेवर गुजरातीचा तर लेवा बोलीवर वऱ्हाडीचा प्रभाव अधिक आहे.

२) प्रमाण मराठीतील 'च' वर्गीय दोन उच्चार लेवा बोलीत आढळतात. तर अहिराणीत गुजराती प्रमाणे 'च' वर्गीय व्यंजनाचे केवळ तालव्य उच्चार प्रामुख्याने आढळतात. उदा. चॉलस, जॉस, झॉय.

३) अहिराणीत गुजराती प्रमाणे 'स' ऐवजी 'छ' ही प्रक्रिया घडताना दिसते. उदा. सोड - छोड, सावली - छावली तशी लेवा बोलीत दिसत नाही.

४) गुजरातीत 'श' 'ष' यांचा उच्चार 'स' असा केला जातो.(उदा. शहा - सहा, शाक - साक) तसा अहिराणीत होतो पण लेवा बोलीत होत नाही.

५) लेवा बोलीत 'ज्ञ' चा उच्चार हिंदी प्रमाणे 'ग्य' असा होताना दिसतो. उदा. ज्ञानदेव - ग्यानदेव, ज्ञान - ग्यान तर अहिराणीत गुजराती प्रमाणे 'न्य' होताना दिसतो जसे न्यानदेव, न्यान.

६) लेवा बोलीत काही शब्दात 'व' च्या जागी 'य' येताना दिसतो उदा. दिवा - दिया तसा अहिराणीत येताना दिसत नाही.

७) अहिराणी व लेवा या दोन्ही बोलीत 'ळ' चा 'य' असा उच्चार होतो. मात्र लेवा बोलीत विकल्पाने 'ळ' चा 'ड' असा ही उच्चार होतो. उदा. जळगांव - जडगांव, केळ केड असा विकल्प अहिराणीत दिसत नाही.

**व्याकरण:-**

साम्यः- प्रमाण मराठीतील चतुर्थीच्या 'ला' प्रत्यया ऐवजी लेवा बोलीत 'ले' चा वापर होतो. तसा अहिराणीत ही होतो. उदा.मला- मले (लेवा) -माले (अहिराणी)

भेदः- १) वर्तमानकाळी क्रियापदांना अहिराणीत 'स' 'तस' प्रत्यय लागतात. उदा.मी करस, तू करस, तुम्ही करतस, त्या करतस. लेवा बोलीतील ही रूपे मराठी प्रमाणे दिसतात. उदा. तो करतो, मी करतो, तू करतो, तुमी करता, ते करतात.

२) अहिराणीत कित्येकदा भूतकाळ करण्यासाठी धातूला 'न', 'नूत', 'नो', 'नात' हे प्रत्यय लावले जातात. उदा. मी बसनु, आम्ही बसनूत, त्या बसनात. लेवा बोलीत धातूना मराठी व वऱ्हाडी प्रमाणे 'लो', 'लोत', 'लेत', 'ले' हे प्रत्यय लागतात.उदा. मी, बसलो आम्ही बसलोत, ते बसलेत, ते बसले.

३) अहिराणीत प्र.पु.ए.व. 'मी' या सर्वनामाला प्रत्यय लागण्याचा वेळी सामान्यरूप होताना 'अ' चा 'आ' होतो. उदा. मला- माले,लेवा बोलीत 'अ'च राहतो उदा. मला- मले तसा विकल्पाने 'आ' ही होतो. उदा. मला- माले.

**शब्दसंग्रह :-**

लेवा बोली प्रदेशाच्या उत्तरेस मध्यप्रदेश, पूर्वेस वऱ्हाड, दक्षिणेस मराठवाडा विभाग आहे. या भागातील बोलीवर फारसी अरबीचा प्रभाव असल्याने लेवा बोलीत ही आसू, बेपार, बरसात, बरकत, बाजिंदी असे शब्द आढळतात. याशिवाय धुर्करी, सगर फर्य गिंध्या, धुक्कय असे वेगळे शब्द आढळतात. तथापि अधिक प्रभाव जाणवतो तो वऱ्हाडीचा.

उलट अहिराणी परिसराच्या पश्चिमेस गुजरात प्रदेश असल्याने अहिराणीतील अनेक शब्दांचे गुजराती शब्दाशी साम्य आढळते. काही विशिष्ट शब्द या चार ही बोलीत कसे वेगळे आहेत, आणि अहिराणी गुजराती तसेच लेवा - वऱ्हाडी यातील शब्दात कसे साम्य आहे. ते खालील उदाहरणावरून लक्षात येईल.

| प्रमाण मराठी | अहिराणी | गुजराती | लेवा | वऱ्हाडी |
|---|---|---|---|---|
| सून | उहु | ववू | वारी/वाहारी | वाहारी |
| मावशी | मावसी | मासी | जीजी | जीजी/मावसी |
| म्हातारा | दल्डा | डोहा | बुड्ढा | बुढा |
| म्हातारी | दल्डी | डोही | बुड्ढी | बुढी |
| उपाधी(नाम) | जिभू/जिभाऊ | भाई | बुवा | बुवा/बोवा |
| मुलगा(नाम) | पोऱ्या | पोयरा | पोरगं | पोइ |
| मुलगी | पोरगी/पोर | पोयरी | पोरगी | पोट्टी |
| मुलगा (स्वतःचा) | आंडोर | डिक्रो | लेक | लेक |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| मुलगी | आंडेर | डिक्री | लेक | लेक |
| पुतण्या | डिक्रा | भतीजी | पुतन्या | पुतन्या |
| पुतणी | डिक्री | भतीजी | पुतनी | पुतनी |
| आत्या | फुई | फोई | आत्या | फुई |
| आत्याचा पती | फुवा | फुवा | मामा | बुबा/बुवा |

वरील निरीक्षणांवरून अहिराणी आणि लेवा मधील भिन्नत्व स्पष्ट होते. एका भाषा-कुलातील जवळ जवळच्या भागात बोलल्या जाणाऱ्या या दोन खानदेशातील बोली भगिनी आहेत. त्यांच्यात जसे साम्य आहे तसेच भिन्नत्व ही आहे. उच्चार, व्याकरण आणि शब्दसंग्रह यातील वेगळेपणामुळे या भाषांचे स्वरूप निश्चितच अलग अलग आहे.

वर नोंदवलेल्या निरीक्षणात आपण बहिणाबाईच्या काव्यातील बहुसंख्य उदाहरणांचा उपयोग केला आहे. त्यामुळे बहिणाबाईंची कविता अहिराणी बोलीतील नसून लेवा बोलीतील आहे, हे स्पष्ट व्हावे. अधिक स्पष्टीकरणार्थ बहिणाबाईंच्या एका कवितेचे अहिराणी रूपांतर करून पाहू. पुढे ''माझी माय सरसोती'' या कवितेतील त्या त्या ओळीचे अहिराणी रूपांतर त्या त्या ओळीच्या पुढे दिले आहे.

| ✲लेवा बोलीतील मूळ कविता | ✲अहिराणी रूपांतर |
|---|---|
| ''माझी माय सरसोती'' | ''मन्ही माय सरसोती'' |
| माझी माय सरसोती | मन्ही माय सरसोती |
| माले शिकवते बोली | माले शिकाडस बोली |
| लेक बहिनाच्या मनी | लेक बहिनाना मनी(मनम्हा) |
| किती गुपीत पेरली! | किती गुपीतं पेरंनी! |
| माझ्यासाठी पांडुरंगा | मन्हा साठे पांडुरंगा |
| तुझे गीता-भागवत | तुन्ह गीता-भागवत |
| पावसात समावतं | पानी म्हान् समावस |
| माटीमधी उगवतं | माटीम्हान् उगवस |
| अरे देवाच दर्शन | आरे देवनं दर्शन |
| झालं झालं आपसूक | झायं झायं आपसूक |
| हिरिदात सूर्यबापा | हिरिदात सूर्यबापा |
| दाये अरूपाचं रूप! | दाये अरूपानं रूप! |
| तुझ्या पायाची चाहूल | तुन्हा पायनी चाहूल |
| लागे पाना-पाना मधी | लागे पान-पान म्हान |
| देवा तुझं येनं जानं | देवा तुन्हं येनं जानं |
| वारा सांगे कानामधी | वारा सांगे कान म्हान |





अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| फुलामधी समावला | फुलम्हान समावना |
| धरतीचा परमय | धरतीना परमय |
| माझ्या नाकाले इचारा | मन्हा नाकले इचारा |
| नथ नीले त्याचं काय? | नथनीले तेन्हं काय? |
| किती रंगवशी रंग | किती रंगाडसी रंग |
| रंग भरले डोयात | रंग भरना डोयाम्हान |
| माझ्यासाठी शिरिरंग | मन्हासाठे सिरिरंग |
| रंग खेये आभायात | रंग खेये आभाय म्हान |
| धर्तीमधल्या रसानं | धर्तीम्हादला रसवन्हे |
| जीभ माझी सवादते | जीभ मन्ही सवादस् |
| तव्हा तोंडातली चव . | तव्हा तोंडम्हादली चव |
| पिंडामधी ठाव घेते | पिंड म्हान ठाव ल्हेस. |

**संदर्भ**


१) भाषाः इतिहास आणि भूगोल- कालेलकर ना.गो. मौज प्रकाशन गृह मुंबई दु.आ. १९८५ किं. ४०/-रु. पृ.१४०

२) वर्णनात्मक भाषा विज्ञानः स्वरूप आणि पद्धती- संपा-डॉ. कल्याण काळे, डॉ. अंजली सोमण गोखले एज्यू. सोसा. नाशिक प.आ. १९८२ किं. ४८/-रु. पृ २७९

३) बहिणाबाईंची गाणी : बहिणाबाई चौधरी - सुचित्रा प्रकाशन मुंबई पा.आ. १९८७ किं ५०/- ए.पृ. ९७+१३३.

अहिराणी लोकसाहित्याची वैशिष्ट्ये- डॉ. दा.गो. बोरसे गिरिजा साहित्य प्रकाशन नागपूर प.आ १९८९ किं ८०/- रु. ए.पृ. १९५

५) 'बहिणाबाईंची गाणी' एक अभ्यास- सौ. ऋचा पित्रे
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ प्रकाशन प.आ. १९८३ किं १३/- रु ए.पृ १११+७



**५६ ब, मंगलदास पार्क, नवापूर जि. धुळे ४२५ ४१८.**




---

## शब्दबाजीवर उतारा

(प्रचंड खप असलेल्या काही वृत्तपत्रांच्या मुळे) शब्दबाजीलाच नव्हे, उघड भाषिक दोषांनाही प्रतिष्ठा मिळत आहे. अशा एका प्रतिष्ठित पत्राने एका बातमीला पोट-मथळा दिला. 'केंद्राची असहमती.' त्याच बातमीला त्याच तोलाची प्रतिष्ठा असलेल्या एका पत्राने सरळ पोट-मथळा दिला. 'केंद्राचा नकार.'

-म्हणजे आशेला अर्धी मुर्धी तरी जागा आहे!

**प्रा.मं.वि. राजाध्यक्ष - भाषाविवेक, श्री विद्या प्रकाशन, पुणे १९९७ पृ. १९२**

# उच्चारण-संकेत आणि लेखन संकेत यांचा ताळमेळ

**(भाषा आणि जीवन : वर्ष १४ : अंक २ - उन्हाळा १९९६- 'भाषांभाषांतील उच्चारण संकेत' - प्रा. मनोहर राईलकर यांच्या लेखाच्या संदर्भात)**

**सत्त्वशीला सामंत**

सदर लेखात वेगवेगळ्या भाषांतील उदाहरणे देऊन, प्रा. राईलकरांनी भाषांमधील उच्चारण-संकेत व लेखन-संकेत यांचा तंतोतंत ताळमेळ जमत नाही हे दाखवून दिले आहे. मात्र त्यामागील कारणपरंपरा आपणास माहीत नाही, ती काहीतरी असावी असे ते म्हणतात. पण असा ताळमेळ नसूनही त्या त्या भाषकांचा भाषिक व्यवहार निर्विघ्नपणे चालतो असे दिसते. आपण सर्व भारतीय वारंवार ज्या भाषेकडे मार्गदर्शनासाठी डोळे लावतो त्या इंग्रजी भाषेतही अशा प्रकारचे गैरनियम (irregular) संकेत आहेत.

उदा. 1) write, rite, right

(उच्चार सर्वसाधारणपणे सारखा, पण वर्णलेखन निराळे.)

2) read (वर्तमानकाळ) ; read (भूतकाळ)

(वर्णलेखन सारखे, पण उच्चार निराळे.)

असे असूनही, आतापर्यंत कोणत्याही भाषेत 'उच्चाराबरहुकूम लेखना'चा आग्रह धरणाऱ्या चळवळी वारंवार झाल्याचे फारसे ऐकिवात नाही. अलिकडे मात्र इंग्लंडमध्ये काही मोजक्या मंडळींनी 'Simplified Spelling Society नावाची एक संस्था स्थापन करून अशी मोहीम सुरू केल्याचे समजते. भारतात श्री. गोविंद देवधरे नामक एक गृहस्थ त्या संस्थेचे सदस्य असून, त्यांनी या तत्त्वाचा पुरस्कार करण्यासाठी Logicon नावाची पुस्तिका प्रसिद्ध केली आहे. (उदाहरणादाखल, philosophical ऐवजी filosofikal असे स्पेलिंग लिहावे असा त्यांचा आग्रह.)

श्री. देवधरे यांच्यासारखे एकांडे शिलेदार जेव्हा प्रवाहाविरूद्ध दंड थोपटून उभे राहतात व तो प्रवाह वळवण्याचा प्रयत्न करतात तेव्हा बहुधा असे प्रयत्न फसतात. कारण, कोणतेही स्पेलिंग हे आजच्या घडीला उच्चाराशी थोडेसे विसंगत वाटले तरी, त्यामागे परंपरेचा, व्युत्पत्तीचा कोणतातरी धागा असतो. म्हणूनच कित्येक शब्दांच्या उच्चारात एखादा वर्ण निभृत (silent) असला तरी, वर्णलेखातून त्याची हकालपट्टी होत नाही. (उदा.

crochet) कारण हे भाषक समाज आपली सांस्कृतिक वैशिष्टये जपू पाहतात. अमेरिकन लोकांनी इंग्लिश भाषेतील काही स्पेलिंगे बदलली असली (colour color, jewellery jewelry) तरी, ते बदल इतके नगण्य आहेत की त्यामुळे इंग्लंड - अमेरिकेचा संवाद तुटणार नाही व तो तुटू नये याची काळजी घेण्याइतपत अमेरिकन लोक शहाणे आहेत.

प्राचीन काळी 'ज्ञ' या जोडाक्षरांचा उच्चार 'ज्ञ' असा होता व त्याचा विग्रह 'ज+ञ' असा होता. संस्कृत शब्दकोषात 'ज्ञ' अक्षराचा क्रम 'ज्' वर्गाच्या अखेरीस लावलेला दिसतो. काळाच्या ओघात वेगवेगळ्या देशी भाषांत त्याचे उच्चारण बदलत गेले. उदा. हिंदीत 'ग्यान' ('ग्यान') तर मराठीत 'द्न्य' ('द्न्यान') असे झाले. पण तरीही लेखनसंकेताचे सातत्य टिकवण्यासाठी 'ज्ञ' ही अक्षराकृती कोणीही बदलली नाही व म्हणूनच आज आपण 'ज्ञानेश्वरी' वाचू शकतो व तिच्याशी अनुबंध राखू शकतो. याचा अर्थ असा नव्हे की, लिपी आतापर्यंत अपरिवर्तनीयच राहिली आहे. भाषा ही सतत वाहणाऱ्या ओघवती नदीप्रमाणे असते. ती सतत वाहत असते, बदलत असते, तरी ही ती तीच नदी राहते. या ठिकाणी 'प्रवाहसातत्याचे तत्त्व' (doctrine of flux) लागू होते. व्यक्तीसुद्धा लहानाची मोठी होते, तरीही तिला आपण 'तीच व्यक्ती' म्हणून ओळखतो. पण हा परिवर्तनक्रम नैसर्गिक असतो व तसा तो राहिला पाहिजे. मध्येच कोणा व्यक्तीने वा संस्थेने फतवे काढून तो प्रवाह बदलण्याचा प्रयत्न करू नये. असे प्रयत्न बहुधा अयशस्वी होतात, पण कधी कधी यशस्वी होतात. भाषिक प्रदूषण करण्याची ताकद अगदी क्षीण असेल तर, भाषानदी ते अडथळे दुर्लक्षून पुढे जाते. पण पुरोगामित्वाच्या नावाखाली अशा प्रयत्नांचे घळ वाढले तर, नदीचे प्रदूषण वाढते. (गंगा नदी याचे ठळक उदाहरण आहे.) व तिचा प्रवाह त्यामुळे कुंठित होऊ शकतो.

स्वातंत्र्योत्तर काळात समाजातला उपेक्षित वर्ग शिक्षणाच्या प्रवाहात आला. त्याबरोबर महाराष्ट्रातील सत्तादेखील बहुजन समाजाच्या हाती गेली. तेव्हा सत्तारूढ समाजातील व्यक्तींना सोपी जाईल अशी लेखनपद्धती आणावी अशा अर्थाची दडपणे साहित्यधुरीणांवर आली आणि मराठीच्या लेखनपद्धतीचे लोकशाहीकरण सुरू झाले. बहुसंख्येची व बहुमताची भाषा सुरू झाली व इथेच मराठीच्या लेखनपद्धतीला घसरगुंडी लागली. १९६२ साली राजदंडाचा बडगा दाखवून महाराष्ट्र शासनाने मराठी शुद्धलेखनपद्धती बदलण्याचा दुःशासनी प्रयत्न केला. त्यावेळी सरकारी रेट्यामुळे मराठीच्या लेखनपद्धतीत फार मोठे स्थित्यंतर झाले. ''या सरकारमान्य नियमांचे सर्वसाधारणपणे 'उच्चारानुसारी लेखन' हे प्रमुख वैशिष्ट्य आहे.''

(शुद्धलेखन नियमावली प्रका. भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, १९८७. उपोद्घात - परि.३)

याचे भीषण परिणाम तात्काळ जाणवले नाहीत. कारण, १९६२ साली जी पिढी अस्तित्वात होती ती जुन्या-नव्यातील संक्रमणाला साक्षीदार होती, म्हणून ती नवीन

स्थित्यंतराशी कसेबसे जमवून घेऊ शकली. कारण जे नवीन वर्णलेखन डोळ्यांसमोर आले त्या जागी पूर्वी काय होते याची तिला आठवण होती व म्हणून लिंगवचनाविषयी त्यांचे फारसे घोटाळे झाले नाहीत. पण आता ३०/४० वर्षांनंतर ते भयावह परिणाम आपल्याला वृत्तपत्रांत वा दूरदर्शनवर हरघडी नजरेला पडत आहेत. आता जी नवीन पिढी उदयाला येत आहे तिला जुन्याची ओळखच नाही. अनुस्वारांच्या अभावीं त्यांच्या हातून घोटाळे होऊ लागलेत. 'लोकसत्ता' सारख्या प्रतिष्ठित वर्तमानपत्रात 'त्यांचे धाबे दणाणले आहेत' अशासारखी वाक्ये सर्रास आढळतात. (मुद्राणदोष नव्हे!) 'लेणी' हा मूळचा नपुंसकलिंगी एकवचनी शब्द असून, 'लेणी' (पूर्वी 'लेणीं') हे त्याचे अनेकवचन आहे हे लक्षात न आल्याने, युवा पत्रकार अलिकडे 'लेणी' (स्त्री. एकवचन) व 'लेण्या' (स्त्री.अनेकवचन) असे शब्दप्रयोग करतात. अनुस्वारांचे महत्व काय होते हे आतातरी पुरोगामी विद्वानांच्या लक्षात यावे. अतिरिक्त दीर्घीकरणाची सवय लागल्याचे 'कधी 'कविसंमेलन', तर कधी 'कवीसंमेलन' असे संभ्रमकारी वर्णलेखन आढळते. 'त्याच्या घरात बरीच संपत्ती होती' व त्याच्या पश्चात बरीच संपत्ती होती' हे दोन्ही प्रयोग सारखेच झाल्याने, नवीन पिढीला 'पश्चात' हे कशाचे तरी सप्तम्यन्त रूप आहे असे वाटल्यास नवल नाही. पण आता 'पश्चात् ताप' करून काय उपयोग? झाले तेवढे दशावतार खूप झाले असे म्हणून विद्वानांनी निदान पुढील प्रदूषण थांबवावे. 'जुने ते सोने' असे म्हणून घड्याळाचे काटे मागे फिरवल्याने काळाचे चक्र फिरवता येणार नाही, हे खरे. पण त्याचप्रमाणे पुरोगामित्वाच्या नावाखाली घड्याळाचे काटे पुढे फिरवून ठेवल्यानेही आपल्या म्हणण्याप्रमाणे काळ पुढे धावणार नाही. तो आपल्याच गतीने पुढे सरकणार. उलट, आपण कालविसंगत ठरून भाषिक प्रदूषण व अनागोंदी माजेल. अर्थात्, त्याचे सोयरसुतक तथाकथित पुरोगामी विद्वानांना असण्याचे कारण नाही. कारण ही मावळती पिढी असून, त्यांची भावी पिढी अमेरिकेकडे डोळे लावून बसली आहे व मराठी ही फक्त माजघर आणि स्वयंपाकघर एवढ्यापुरती वापरायची बोली राहण्याची चिन्हे दिसत आहेत.

बोलभाषा आधी व मग लेखी भाषा हा नैसर्गिम क्रम असून, लेखी भाषा हे बोलभाषेचे प्रतिबिंब होय हे सर्वसाधारणपणे खरे आहे व देवनागरीच्या बाबतीत तर ते अधिकच खरे आहे. तथापि, ज्या दोन व्यक्ती एकमेकींशी संभाषणव्यवहार करू शकतात त्यांच्यातील संपर्कासाठी बोलभाषा प्रयुक्त होते. अशावेळी एकमेकींचा आशय स्पष्ट होण्यासाठीं शब्दोच्चारांना हावभाव किंवा स्वराघात यांची जोड मिळते. पण जेव्हा दोन व्यक्तींमध्ये संभाषण व्यवहार अशक्य असतो तेव्हा, लेखनाचा आश्रय घेतला जातो. अशावेळी आशयस्पष्टतेसाठी लेखनसरणी निःसंदिग्ध असावी लागते व त्याकरता त्या त्या भाषेत काही लेखनसंकेत रूढ झालेले असतात. ते स्थिर असावेत अशीही अपेक्षा असते. ते वारंवार बदलून चालत नाही. बदलायचेच झाले तर अतिशय विचारपूर्वक बदलले पाहिजेत. पण मराठीत एकेकाळी नवे भाषाशास्त्र शिकून आलेल्या तज्ज्ञांचा वर्ग उदयाला आला व त्यांनी

'उच्चारानुसारी लेखन' असा एक नवा विचारप्रवाह मराठीत आणला, त्याला सरकार दरबारी मान्यता मिळाली व सोपेपणाच्या नावाखाली त्याची घोडदौड सुरू झाली.

पण जुन्या काळीसुद्धा जेव्हा शुद्धलेखनाचे नियम काटेकोरपणे पाळले जात असत असे म्हणतात त्याही काळीं नियमबाह्य लेखन करणाऱ्यांची बहुसंख्या होती. खाजगी पत्रव्यवहारातील लेखन हे बऱ्याचदा अशुद्ध असे. पण त्या लेखनाला साहित्यिक वर्तुळात मान्यता नव्हती व सार्वजनिक स्तरावर होणारे लिखाण हे नियमानुसार होत असे. म्हणजे शुद्धलेखन हे फक्त साहित्यिक, विद्वान्, पत्रकार, शिक्षक, इ. मोजक्या बुद्धिमंत वर्गानेच सांभाळावयाचे हे अपेक्षित होते व तसेच ते असावे. या प्रांतात लोकशाही तत्त्व अप्रस्तुत ठरते. पण मराठी शुद्धलेखन-पद्धतीचे लोकशाहीकरण सुरू झाल्यापासून कशालाच काही धरबंद राहिला नाही. याचे दृश्य परिणाम आपल्याला प्रसारमाध्यमांतून हरघडी दिसतात व त्या तत्त्वाचे पुरस्कर्तेसुद्धा 'शुद्धलेखन बिघडल्याची' तक्रार करतात. या लोकशाही प्रक्रियेला राजमान्यता मिळाल्याने या दुरवस्थेत अधिकच भर पडली.

वस्तुतः, उच्चारणाचे देखील काही शिष्टमान्य संकेत असतात. पण आजकाल रेडिओ, दूरदर्शन, इ. वरील बातम्या ऐकताना, याही संकेतांचे अजाणता उल्लंघन होत असल्याचे आपणांस जाणवते. मग 'उच्चारानुसार लेखन' हे तत्त्व अमलात आणायचे तर कोणाचे उच्चार प्रमाण मानावयाचे हा प्रश्न पडतो. आजकाल काही स्वयंमन्य तज्ज्ञ स्वतःच काही लेखनसंकेत बदलतात. (उदा. 'उद्‌गम' व 'पडघम' या दोहोंचे उच्चार सारखे म्हणून त्यांनी 'उदगम' व 'पडघम' असे लेखन सुरू करून समानता आणली आहे. वास्तविक, त्यांनी 'उद्‌गम' व 'पड्‌घम' असे लिहिले असते तर ते 'उच्चारानुसारी लेखना'स अधिक धरून झाले असते. 'ब्रह्म' या शब्दामागील अर्थपरंपरा व प्राचीन तत्त्वज्ञानाशी असलेला त्याचा अनुबंध लक्षात न घेता आणि त्याच्या रूढ वर्णलेखनाला आंतरराष्ट्रीय स्तरावर मिळालेली मान्यता (Brahma) दुर्लक्षून, काही विद्वानांनी त्याचा वर्णविपर्यय करून टाकला. मग 'ज्ञानदेवी' सारख्या ग्रंथात अडचण आल्यावर तेथे अपवाद करून 'ब्रह्म' हेच वर्णलेखन कायम ठेवले. म्हणजे 'ब्रह्म' हे वर्णलेखन करणारे विद्वानच आणि 'ब्रम्ह' हे बरोबर ठरवणारेही विद्वानच. त्यामुळे या मतमतांतरांच्या गलबल्यात 'महाराष्ट्र टाइम्स'ची अगदी पंचाईत होऊन गेली. मग एका रकान्यात 'ब्रह्म' व दुसऱ्या रकान्यात 'ब्रम्ह' असा ब्रह्मघोटाळा' सुरू झाला.

एकदा बहुसंख्येचाच निकष मानला तर, शु'ध्द' या चुकीच्या वर्णलेखनालाही मान्यता द्यावी लागेल. 'उच्चारानुसारी लेखन' हे तत्त्व तरी कितीसे प्रामाणिकपणे पाळणे शक्य आहे याचाही विचार व्हावयास हवा. (उदा. 'राम' व 'विविध' या दोहोंचा उच्चार भिन्न असूनही लेखन सारखेच केले जाते. 'विष, 'गुण' या शब्दांतील उपान्त्य स्वर दीर्घ उच्चारला जात असूनही ते 'वीष' 'गूण' असे लिहिण्यास अद्याप मान्यता नाही. उच्चाराबरहुकूम तंतोतंत लेखन' हे फक्त ध्वनिलिपीतच शक्य आहे हे सर्वमान्य आहे. पण

ती लिपी फक्त एखादी भाषा नव्याने शिकणाऱ्या परभाषकांना शिकाऊ भाषेचे उच्चार नीटपणे समजावेत यासाठी अभिप्रेत आहे. वर्तमानपत्रे, इ. सारख्या दैनंदिन माध्यमात ते व्यवहार्य होणार नाही.

फेब्रुवारी १९९७ मध्ये प्रसिद्ध समीक्षक श्री. श्री. पु. भागवत यांच्या सन्मानार्थ 'ग्रंथाली'ने एक सत्कार-सोहळा आयोजित केला होता. त्या प्रसंगी, साहित्याने परंपरा आणि नवता यांची यथायोग्य सांगड घालावी अशा आशयाचे त्यांनी प्रतिपादन केले. उच्चारण व लेखन यांच्या बाबतीतही ते खरे आहे. उच्चारण नवतेला सामोरे जात असते व लेखन हे परंपरा सांभाळते. उच्चारणाच्या वेगाने लेखनाची फरफट होऊ नये. Knowledge advances, wisdom lingers. या वचनाच्या चालीवर, उच्चारणाची भरधाव प्रगती झाली तरी, लेखनाने मात्र संथ व धीम्या गतीनेच चालावे हे इष्ट! सोसायटी,

**१६, यशोदाकुंज सोसायटी, सी.टी.एस्. ३३२, तेजस् सोसायटीजवळ, कोथरुड, पुणे ४०००२९**



---

## भाषिक सासुरवास

भाषेविषयीची पुराणपूजेची उच्चनीच भावाची, आक्रमक वृत्ती ही आपल्या देशाची खासियत नाही. कित्येक शतके पुढारीपण मिरवणाऱ्या यूरपमधील देशांनीही तिचे वेळोवेळी प्रदर्शन केले. हाताशी असलेली काही उदाहरणे अशी : लॅटिन ही मृतभाषा झाल्यावरही तिच्याशिवाय ख्रिस्ती धर्मसंस्थेतच नव्हे तर राज्य समारंभात, कायदेकानून, शिक्षणात फार काळ पान हलत नसे. साहित्यातही तिचा सासुरवास अगणित पिढ्या टिकला. वस्तुतः ग्रीक ही भाषा तिच्याहून ज्येष्ठ - वयानेच नव्हे, थोरवीनेही. पण तोरा होता लॅटिनचा. स्पेनमधील बास्क हा विभाग आणि त्याची भाषा, यांना सदैव सावत्रपणाची वागणूक मिळाली. त्याविरूद्ध आवाज उठवणाऱ्या शेकडो जणांची हत्या झाली; आणि जनरल फ्रँकोच्या अमदानीत तर ती भाषा उघड्यावर बोलणाऱ्यांना तुरुंगवास घडे. बास्क या शब्दापासून त्या भाषेचे फ्रान्सशी लागेबांधे आहेत हे त्या द्वेषाचे मूळ. पणं फ्रान्सही यात मागे नाही. ब्रेताँ या फ्रेंचच्या पोटभाषेत पत्रावर पत्ता लिहिला तर ते 'ब्रेताँत पत्ता लिहिण्यास बंदी' अशा मगरूर शिक्क्यानिशी परत येते. कॅनडात निराळेच. त्या देशात इंग्रजी व फ्रेंच या उभय भाषांना समान स्थान. पण फ्रेंच बोलणाऱ्यांची बहुसंख्या असलेल्या भागात त्यांना स्वतंत्र राज्य हवे! त्या भागात इंग्रजीची हरतऱ्हांनी मुस्कटदाबी होत आहे. त्यासाठी खास पोलीस आहेत. आणि भाषेच्या नावाने खूनखराबाही चालू असतो.

**प्रा.मं.वि. राजाध्यक्ष - भाषाविवेक, श्री विद्या प्रकाशन, पुणे १९९७ पृ. ३**





अनुक्रमणिका

- १ -

ज्याची त्याची प्रचीती

# *भाषा राजनीतीची*

**सरोजा भाटे**

श्रीलंकेतील एका विद्यापीठातील संस्कृतच्या प्राध्यापिका डॉ. रत्ना हांडुरुकांडे यांनी सांगितलेला हा किस्सा.

चौ एन लाय चीनचे पंतप्रधान होते तेव्हाची गोष्ट. त्यांनी श्रीलंकेला सदिच्छा भेट दिली तेव्हा त्यांचे जाहीर भाषण झाले. त्यावेळी त्यांच्या चिनी भाषणाचा सिंहलीमध्ये अनुवाद करण्यासाठी विख्यात भाषाविशारद डॉ. मलल सेखर यांना पाचारण करण्यात आले. चौ एन लाय यांच्या भाषणानंतर डॉ. मलल सेखर यांनी त्याचा गोषवारा सिंहलीत सांगितला. त्याचा मराठी आशय असा

मित्रहो, आज आपल्या देशाला भेट देताना मला अतिशय आनंद होत आहे. फार दिवसांपासून माझी तशी इच्छा होती. आपण केलेल्या स्वागताने मी भारावून गेलो आहे. चीन आणि श्रीलंका या देशांचे मैत्रीचे संबंध या भेटीमुळे अधिक दृढ होतील असा मला विश्वास वाटतो.

नंतर आयोजित केलेल्या मेजवानीच्या वेळी डॉ. मलल सेखर चौ एन लाय यांना भेटून म्हणाले (बहुधा इंग्रजीत म्हणाले असावेत),

''मला माफ करा. आपल्या भाषणाचे एक अक्षरही मला समजले नाही. कारण मला चिनी भाषा येत नाही. तरीही मी आपल्या भाषणाचा गोषवारा अंदाजपंचे ठोकून दिला''

''असं का केलं?'' चौ एन लायनी विचारले

''काय करणार?'' मलल सेखर म्हणाले, '' मला अनेक भाषा अवगत आहेत असा माझा लौकिक ऐकल्यामुळे मला चिनी भाषाही येत असणार असं समजून ऐन वेळी ही कामगिरी माझ्यावर सोपवण्यात आली आणि अधिकाऱ्यांची आणि समारंभाची गैरसोय होऊ नये म्हणून मी ती पत्करली ''.'' मग आपण काय सांगितलात गोषवारा माझ्या भाषणाचा?'' या चौ एन लाय यांच्या प्रश्नावर मलल सेखरांनी आपला गोषवारा त्यांना ऐकवला. त्यावर चौ एन लाय उद्गारले,

''अरे वा, नेमकं हेच सांगितलं मी माझ्या भाषणात.''

**प्राध्यापिका आणि प्रमुख, संस्कृत विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११००७**



- २ -

# मराठी लिपीतील काही अक्षरात व जोडाक्षरात बदल

केशवराव शेजाळ

अनेक वर्षांपासून रूढ झालेली मराठी लिपी आहे, तीत काही वेळा थोडाफार बदल करण्यात आला, तरी पण माझ्यामते आणखी बराच बदल करणे अत्यावश्यक आहे.

याबाबतीत मी केलेले संशोधन डॉ.गं.ना. जोगळेकर, निमंत्रक शुद्धलेखन समिती मराठी साहित्य महामंडळ, पुणे यांचेकडे दि. ३०.६.९० रोजी कळविले. त्यानंतर भाषा संचालनालय, मुंबई ३२ यांचेकडे कळविले. त्यांनी डॉ. अशोक रा. केळकर, निवृत्त उपयोजित भाषा विज्ञान प्राध्यापक, डेक्कन कॉलेज, पुणे यांचा अभिप्राय घेऊन मला पाठवला, तो संमिश्र आहे.

सध्या शासनमान्य आहे ती लिपी अशी

अ आ इ ई उ ऊ ए ऐ ओ औ अं अः

परंतु यात इ ई उ ऊ ए ऐ चुकीचे आहेत.

आणि अ आ ओ औ अं अः हे योग्य आहेत.

कारण

क् + अ = क : क् + आ = का

क् + ओ = को : क् + ओ = कौ हे योग्य आहेत

क् + अं = कं : क् + अः = कः

परंतु

क् + इ = कि : क् + ई = की

क् + उ = कु : क् + ऊ = कू हे योग्य आहेत.

क् + ए = के : क् + ऐ = कै

ते नियमात बसत नाही. हे स्वर निश्चितच बदलावयास पाहिजेत. कारण विसंगतीमुळे विद्यार्थ्यांना समजावून सांगणे देखील जमत नाही असा माझा अनुभव आहे. त्यापेक्षा हे सुसंगत वाटते.

क् + अ (ा) क

क् + आ (ाा) का

क् + अि (ि) कि

क् + अी (ी) की

क् + अु (ु) कु

क् + अू ( ू ) कू
क् + अे ( े ) के
क् + अै ( ै ) कै
क् + ओ ( ो ) को
क् + औ ( ौ ) कौ
क् + अं ( ं ) कं
क् + अः ( : ) कः

तसेच र रा रि री लिहितांना पुढे रु रू लिहितो. हे रु रू लिहिणे इष्ट नाही, कारण सर्व उकार खाली दिले जातात तर र ला उकार समोर का? त्याचा सुद्धा खालीच यायला पाहिजे. जसे रु रू

जोडाक्षरे पहाताना किती विसंगत आहेत ''प'' च्या समोर (॒) अशी तिरपी रेष दिली तर ''प्र''होतो मग स च्या समोर तिरपी दिल्यास ''स''असा का नाही? किंवा ''श्र'' असा का नाही? मध्ये ''श्र'' असा आला कोठून ? ''त'' च्या समोर थोडी सरळ रेष(-) ''त्त'' होतो. तशीच सरळ रेष (-) ''ह'' च्या पुढे दिली तर ''ऱ्ह'' होतो. अशी तफावत का? अशा अर्थहीन रेषा नकोत. कळ्या, विठ्ठल, राष्ट्र, हृदय, पत्र, मुद्रण, बुद्धी,स्मृती यात कोठे जोडाक्षर (अर्ध) खाली, कोठे बाजूला तर कोठे समोर म्हणजे कोणताच ताळमेळ नाही.

पहिल्या इयत्तेच्या बालभारतीत-श+र-श्र,द + या= द्या म्हणजे यांचा समोरचा भाग वाकडा लिहिला. स् - स + व = स्व, प् - ए + न =प्न, व् - ० + ह = व्ह, त् + र = त्र, प + र = प्र, ट्र यात देखील कोठेच ताळमेळ नाही. यापेक्षा सारखेपणा आणि सुलभता यावी यासाठी जोडाक्षराच्या पूर्वीचे अक्षर लंगडे(पायमोड) करून दुसरे पूर्ण असावे

| चुकीचे रूढ झालेले शब्द | | माझे मते योग्य शब्द |
|---|---|---|
| समृद्धी | - | सम्रुद्धी |
| बुद्धी | - | बुद्धी |
| नक्की | - | नक्की |
| क्रमांक | - | क्रमांक |
| कष्ट | - | कष्ट |
| श्री | - | श्री |
| दृष्टी | - | द्रुष्टी |
| पत्र | - | पत्र |
| वात्सल्य | - | वात्सल्य |
| भक्त | - | भक्त |
| आत्मविश्वास | - | आत्मविश्वास |
| नरेंद्र | - | नरेंद्र |





अनुक्रमणिका

| | | |
|---|---|---|
| तृष्णा | - | तृरुषृणा |
| वृक्ष | - | वृरुकृष |
| स्मृती | - | सृमृरुती |
| तऱ्हा | - | तर्‌हा |
| दत्त | - | दत्‌त |
| प्रकाश | - | पृरकाश |
| पराकाष्टा | - | पराकाषृटा |
| महाराष्ट्र | - | महाराषृटृर |

ही जोडाक्षरे केवळ नमुना म्हणून दिली आहेत.

**तिवरंग, पो मुळावा, ता. उमरखेड, जि यवतमाळ ४४५ २११.**



---

## विशेषणबाजी

केवळ शब्दांच्या भुलावणीने लेखन होण्याचा काळ अवनतीचा (decadence) होय. याचा वाचकावर एक महत्वाचा दुष्परिणाम होतो. विशेषणांच्या (किंवा शब्दांच्या) वावटळीत सापडल्यामुळे त्याच्या बरेवाईट पारखण्याच्या शक्तीला बधिरता येते. या विशेषणांच्या बोळ्यांनी त्याच्या मनाची दारे बुजवून टाकली जातात. एकदा प्राध्यापक नरहर रघुनाथ फाटक म्हणाले की, मृत साहित्यिकांसंबंधी बेफाट विशेषणे वापरण्याची आपल्याला इतकी सवय लागून गेलेली आहे की, उद्या एखाद्या वक्त्याने ''कोणी साहित्यिक 'आजानुबाहू' होता'' असे म्हटले तरी लोक टाळ्या पिटतील. साधारण माणसापेक्षा ज्याला अधिक शब्द माहीत आहेत तो साहित्यिक अशी आपली अनेक वाचकांची समजूत असावी अशी शंका येते. ही समजूत सुदैवाने नाहीशी झाली तर अनेक साहित्यिकांच्या यशाची, लोकप्रियतेची, मोजमापे फिरून करावी लागतील.

**प्रा.मं.वि. राजाध्यक्ष - भाषाविवेक, श्री विद्या प्रकाशन, पुणे १९९७ पृ. १४४**





अनुक्रमणिका

साद आणि प्रतिसाद

# आग रामेश्वरी बंब सोमेश्वरी

**मनोहर राईलकर**

'भाषा आणि जीवना'च्या अंक १४/१ मधील संपादकीयाबद्दल मला पुढीलप्रमाणं म्हणायचं आहे.

अकलूजकर-ठाकूर-भिडे आदी मंडळींच्या योजनेबद्दल दैनिकात पूर्वी बातमी वाचली तेव्हाच हे विचार मनात येऊन गेले. पण आता आपल्या कालिकानंही त्यांच्या ह्या उपक्रमाची (योग्य तीच) दखल घेतल्यामुळं आपलं मत मांडणं मला जरुरीचं वाटतं.

ह्या मंडळींचा हा उपक्रम स्तुत्य आहे. यात शंकाच नाही. पण तरीही, तो 'आग रामेश्वरी बंब सोमेश्वरी' या प्रकारचा आहे, असं म्हणावंसं वाटतं. कारण, पाट्या रंगवणारे किंवा जुळारी (संगणकावर जुळणी करणारे धरून), यांना जरी शुद्धाशुद्धतेची माहिती नसली तरी, तेच तेवढे अशुद्ध लेखनास जबाबदार आहेत, असं नाही.

इंग्रजीतील पुढील वचन लक्षात घेण्यासारखं आहे. 'It is not the gun that fights, it's the hand behind it. It's not the hand that fights, it's the heart behind it. त्याच चालीवर, पाट्या रंगवणारे किंवा मजकूर जुळवणारे, चुकांना जबाबदार नव्हेत. त्याना मजकूर लिहून देणारेच जर चुकीचं लिहून देत असतील तर त्या बिचाऱ्यांनी काय करावं? आपल्याकडे येणाऱ्या आमंत्रण -पत्रिका, भेटपत्रं यांवरील अशुद्धलेखन, हे त्यांना तयार करण्यास सांगणाऱ्यांनी जसं दिलं असेल तसंच ते तयार करणार. तेव्हा गंगोत्रीतच कुठं तरी (अशुद्ध) पाणी मुरतं आहे. तिथं शुद्धी करायला पाहिजे. अन्यथा, कलावंत बरोबर सांगतो आहे, पण मालकच ऐकत नाही, असा प्रसंग आला तर चुकीचं असलं तरी तो मुकाट्यानं तसंच लिहिणार. कारण, कलावंत गरजवंत असतो. तो मालकाला काय अक्कल शिकवणार? तेव्हा, मालक मंडळींना सांगायला पाहिजे. बाबा, यद्यपि बहु नाधीषे तथाऽपि पठ पुत्र व्याकरणम् ।' आणि त्यांनी मानलं तरच ह्यात काही सुधारणा होण्याची शक्यता! तेव्हा, इंद्राय तक्षकाय स्वाहा म्हणा. केवळ तक्षक नको. झाडालाच कीड लागली आहे हो. केवळ पानांवर फवारणी करून काय उपयोग!

कित्येक दिवस माझ्या मनात एक विचार येत आहे. समाजाच्याच भाषाशुद्धीचे काम 'मराठी भाषा परिषदेने' शक्य तर या त्रयीची मदत घेऊन करायला पाहिजे. सर्वत्र मराठीची होत असलेली दुर्दशा बघवत नाही. वृत्तपत्रे, दूरदर्शन ह्यांनी तर कहर केलाय. अंनत, दृष्य, संपूर्ण, संन्मान, श्रृती, आदिती, अश्वासन आणि असे कित्येक राक्षस पाहायला मिळतात, वाचावे लागतात. ह्याला जबाबदार कोण ह्याचा शोध घेऊन त्या मूळ ठिकाणी, उपाय करायला हवा. दै. सकाळमध्ये चांगले इंग्रजी कसं बोलावं यावर लेखमाला येत आहे. तशी एखादी मराठीकरिता कुणी करील काय?

**'गजांजली,' ४६ वाळवेकर इस्टेट, पुणे ४११ ००९.**





अनुक्रमणिका

- २ -

# अभ्यासाचा एक वेगळाच पैलू

हेमा क्षीरसागर

'भाषा आणि जीवन' १४:१ हिवाळा १९९६ या अंकात आलेला डॉ.चं.द. इंदापूरकर यांचा लेख वाचला. एखाद्या विषयाचा किती वेगवेगळ्या दृष्टिकोनातून अभ्यास करता येतो, याची या लेखावरून कल्पना आली. ज्ञानेश्वरांच्या पसायदानाच्या अभ्यासाचा एक वेगळाच पैलू प्रस्तुत लेखात आढळला.

अठरावा अध्याय हा ज्ञानेश्वरीचा कळसाध्याय आणि पसायदान हा या अध्यायाचा शिखरबिन्दू होय. पसायदान हे भावार्थाने विश्वगीत आहे. यात प्रारंभी 'विश्वात्मक देवाची' प्रार्थना आहे. विश्वातील भूतमात्रांमध्ये मैत्री वाढावी, सत्कर्माविषयी आवड वाढावी, आणि याचाच सुपरिणाम म्हणून 'जो जे वांछील' ते त्याला मिळावे आणि सारे विश्व सुखी व्हावे अशी प्रार्थना आहे. ही प्रार्थना सुफल होईल असा वर विश्वेश्वराने दिला, आणि त्यामुळे ज्ञानदेव समाधान पावले. हे पसायदान म्हणजे विश्वाच्या मांगल्यासाठी केलेली प्रार्थना आहे आणि म्हणूनच हे विश्वगीत आहे.

या विश्वगीताची अवीट गोडी, शाश्वत सौंदर्य अनुभवण्याचा एक वेगळाच प्रयत्न प्रस्तुत लेखात आढळतो. पसायदानातील ओव्या, त्याची मांडणी, ओव्यांमधील शब्दयोजना, शब्दांची अर्थपूर्णता, त्यातील नादमाधुर्य व रमणीयता यांचा विवेचनात्मक रसास्वाद या लेखात घेतला आहे. लेख अत्यंत अभ्यासपूर्ण असून त्यात अनेक बारकाव्यांचा परामर्श घेतला आहे.

हा लेख वाचत असताना मनात काही शंका उद्भवल्या त्या खालीलप्रमाणे-

१) '- एक रमणीय हेतु ठरतो.'

(पृष्ठ ४०, परिच्छेद १,ओळ शेवटची)

संदर्भानुसार या ठिकाणी 'सेतू' हा शब्द अभिप्रेत आहे. मूळ लेखात 'सेतू' हाच शब्द असेलही. 'हेतू' ही कदाचित् छपाईतली चूकही असू शकेल

२) '- स्वधर्मोसूर्यो पाहो'

(पृष्ठ ४१, रेखाकृती २)

प्रस्तुत लेखकाने प्रारंभीच असे स्पष्ट केले आहे की या लेखासाठी प्रमाणभूत संदर्भप्रत म्हणून प्रा. मंगरूळकरांची 'ज्ञानदेवी' गृहीत धरली आहे. त्या प्रतीनुसार 'स्वधर्मोसूर्यो' याऐवजी 'स्वधर्मसूर्यो' (ज्ञानदेवी १७७४ ) असा पाठ हवा.

३) 'प्राणीमात्र' (पृष्ठ ४१,परिच्छेद शेवटून दुसरा) या ठिकाणी 'प्राणिमात्र' असा शब्द हवा. प्रत्यक्ष ज्ञानदेवीमध्येही ओवी १७७४ मध्ये 'प्राणिजात' हा शब्द आहे. तेथेहि 'णि'





अनुक्रमणिका

ऱ्हस्वच आहे. शुद्धलेखनाच्या नियमानुसारही 'णि'ऱ्हस्व होणे आवश्यक आहे.जसे, 'कवी',पण 'कविसंमेलन.

४) पृष्ठ ४३ वरील पहिल्या परिच्छेदात 'Personification' या अर्थाने 'व्यक्तीकरण'असा शब्द वापरला आहे. मराठी व्याकरणात Persinification या अर्थी 'चेतनागुणोक्ती' (अलंकार) असा शब्द रूढ आहे. अचेतन वस्तूवर चेतनाच्या गुणांचा, भावभावनांचा सुंदर रीतीने आरोप केला असता हा अलंकार होतो.

५)'तप्तहीन' (पृष्ठ ४४, परिच्छेद २) 'तप्तहीन' म्हणजे 'तापहीन', 'दाह न करणारा' हा अर्थ संदर्भाने स्पष्ट होतो.परंतु 'तप्तहीन' हा शब्द कसा सिद्ध होतो? 'हीन' हे विशेषण असून त्याचा अर्थ न्यूनता, कमतरता, उणीव असा होतो. (शब्दशः 'हीन' म्हणजे टाकलेला) उदा. विद्याहीन, धनहीन,गुणहीन [illegible] ठिकाणी 'हीन' शब्दाचा विद्या, धन, गुण इ. नामाशी समास झाला [illegible] तप्तहीन' यात 'तप्त' हे विशेषण आहे. त्याऐवजी 'तापहीन' असा शब्द अधिक सयुक्तिक ठरेल. 'ज्ञानदेवी' भाग ३ (मंगरूळकर प्रत) यामध्येही 'मार्त्तंड जे तपहीन असाच पाठ आहे.

६) 'विश्वाचे प्रतीक असलेले चंद्रमे आणि सूर्य (पृष्ठ ४४,परिच्छेद २,ओळ ६)

याठिकाणी '-चंद्र आणि सूर्य-' असे असावयास हवे. ज्ञानेश्वरांनी 'चंद्रमे' हा अनेकवचनी शब्द 'सज्जनांना' अनुलक्षून वापरला आहे. प्रस्तुत ठिकाणी लेखकांनाही 'सज्जन' हाच अर्थ अभिप्रेत असेल तर मतभेदाचे कारणच नाही.

७) 'चंद्रम्याचं लांछन नष्ट झालं पाहिजे आणि सूर्य तेजस्वी राहूनही तप्तहीन झाले पाहिजेत' (पृष्ठ ४४, परिच्छेद २ ओळ ७)

या वाक्याचा आशय नीटसा स्पष्ट होत नाही. सज्जन हे लांछनरहित चंद्रमे किंवा तापहीन सूर्य होत- अशी मूळ कल्पना आहे. सज्जनांच्या ठिकाणी चंद्राचे गुण (कांती शीतलता इ.) परंतु लांछन (डाग) नाही,तसेच सूर्याचे तेज असूनही दाहकता' हा दोष मात्र नाही. म्हणून सज्जन हे चंद्रसूर्य यांच्याहीपेक्षा श्रेष्ठ आहेत.

८) '- काही विशिष्ट स्वरांचा प्रादुर्भाव-' (पृष्ठ४५ परिच्छेद १ ओळ ३) या ठिकाणी 'प्रादुर्भाव' शब्दाचा अर्थ 'वापर' किंवा 'योजना' असाच आहे की काही वेगळा अर्थ अभिप्रेत आहे ते स्पष्ट होत नाही.

या शंका मनात निर्माण झाल्या असल्या तरीही लेख अतिशय आवडला हे आवर्जून नमूद करावेसे वाटते. पसायदानाची अवीट गोडी चाखण्याचा एक वेगळाच मार्ग लेखकांनी यात दाखवून दिला आहे यात शंका नाही.

**१२९४ शुक्रवार पेठ, सुभाषनगर ७ वा रस्ता, पुणे ४११ ००२**



पुस्तक परीक्षण

# एका विलक्षण भाषावैज्ञानिकाचे मुक्त (आणि बद्धसुद्धा) भाषाचिंतन

परीक्षण लेखक : शैलेश स. पुंडलिक

(ग्रंथाचे नाव : मध्यमा, (ले.) प्रा. अशोक रा. केळकर (१९९६) पृष्ठे २८२, किंमत एकशे ऐंशी रुपये, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे)

'वैखरी' १९८५ मध्ये प्रसिद्ध झाल्यावर 'मध्यमा' कधी येणार याबद्दल भाषाविषयाच्या अभ्यासकांमध्ये कुतूहल होतेच. प्रा. केळकरांचा, प्रदीर्घ व्यासंग लक्षात घेता या दोन प्रकाशनातील अकरा वर्षांचा कालखंड जरा जास्तच आहे असे (खेदाने) म्हणायला हवे. कारण पुण्याच्या डेक्कन कॉलेजमधील भाषाविज्ञान विभागात ज्या काही प्रमुख दिग्गजांनी अध्यापन आणि संशोधन केलेले आहे त्यात प्रा. केळकरांची गणना होते. त्यांनी भाषा व्यवहारासंबंधी केलेली निरीक्षणे, विधाने आणि विवेचने अतिशय लक्षणीय आणि माननीय होतात. अगदी प्रसंगोपात्त म्हणून लिहिलेल्या अशा लेखातूनही त्यांची मार्मिक निरीक्षणशक्ती आणि तर्कशुद्ध विचारसरणी यांचा प्रत्यय येतो. 'मध्यमे'तील त्यांचे चिंतन 'मुक्त' आहे असे म्हणण्याचे कारण विचार आणि अभ्यास यांच्या क्षेत्रात अप्रतिहत संचार करण्यामुळे ते विविध विषयांचा संदर्भ घेत एकाच वेळी अनेक विषयांची चर्चा करतात. 'मध्यमे'तही त्यांनी अशाच प्रकारे अनेक विषयांवरच्या चर्चेत आपला खास ठसा उमटविलेला आहे.

ढोबळ मानाने सांगायचे तर 'मध्यमे'त भाषाकेंद्रित अशा अनेक विषयांवर प्रा. केळकरांचे एकूण बावीस (ओळखपत्रात म्हणल्याप्रमाणे एकवीस नव्हे) लेख संग्रहित केलेले आहेत. त्यांचे वर्गीकरण करताना मराठी आणि इंग्रजी यांचा भाषा आणि शिक्षणाचे माध्यम या भूमिकेतून पाहिल्यावर आढळणारे विविध संबंध या विषयावर सहा, सर्वसामान्यपणे भाषेचे स्वरूप आणि तिची कार्ये या विषयावर आठ तर अनुवाद, व्युत्पत्तिकोश, लोकशिक्षणाची विविध घराणी अशा अनेक वेगवेगळ्या विषयांवर लिहिलेले आठ असे करता येईल. त्यांच्या या लिखाणातील विविधता पाहिल्यावर वाचकाला अलीबाबाच्या गुहेत प्रवेश केल्यासारखे वाटते. त्या खजिन्यातून काय निवडावे हाच खरा प्रश्न आहे. त्यामुळे नीरक्षीरविवेक हा केळकरांच्या बाबतीत तरी आपल्याला





अनुक्रमणिका

आवडणारे क्षीर आणि आपल्या मनोधर्मानुसार आपल्याला (तितके) न आवडणारे क्षीर अशा पद्धतीने वापरावा लागतो. खऱ्या अर्थाने पाहिले तर 'मध्यमा' हा एखाद्या विषयाचा सुसूत्र ऊहापोह करणारा ग्रंथ नव्हे त्यामुळे त्यात आढळणाऱ्या विचारवैविध्याचाही तितक्याच सुसूत्रतेने परिचय करून देणे अवघडच आहे.

त्यामुळे 'मध्यमे'तील प्रत्येक लेखाचा वेगळा परिचय करून देऊन त्याचे विवेचन करण्याचा मोह स्वाभाविक म्हटला तरी तो टाळणे परीक्षणकर्त्याला भाग आहे. वाचकाची पसंती वेगवेगळी असल्याने त्यांना महत्त्वाचे वाटणारे लेख भिन्न भिन्न असू शकतील पण स्थलकालाच्या मर्यादांमुळे मला स्वतःला महत्त्वाच्या वाटणाऱ्या काही विशिष्ट लेखांचाच विचार करणे इथे शक्य होईल. ढोबळ परिचय करून द्यायचा म्हटले तर 'भाषेचे प्रेम आणि भाषेचा द्वेष' 'भाषिक समता, बंधुता आणि स्वाधीनता', 'हे विश्वाचे आंगण...', 'शालेय शिक्षण आणि इंग्रजी माध्यम', 'महाराष्ट्र राज्य शिक्षण क्षेत्रातील मराठी आणि इतर भाषांचे स्थान : एक टिपण' या लेखांमध्ये मराठी भाषकांचे मराठीसंबंधी असणारे प्रेम आविष्कृत करण्यासाठी इंग्रजीचा द्वेष करणे आवश्यक नाही; मातृभाषेव्यतिरिक्त नजीकच्या राज्यातील इतर काही भाषा शिकणे अवघड वाटू नये; विशेषतः भारतीयांची इंग्रजीची गरज न नाकारता हिंदी भाषकांनी एखादी दाक्षिणात्य भाषा शिकल्यास ते स्वागतार्ह होईल; आपले विचार, भावभावना यांचे नवनवीन आकार शोधून त्यांच्या अचूक अभिव्यक्तीसाठी कधी आपल्या भाषेत नवनवीन भाषाप्रयोग करून तर कधी कधी आपली बुद्धी इतरांकडे / परकीयांकडे गहाण न टाकता आपल्या अक्कलहुषारीने आणि राजीखुषीने परभाषेतील चपखल शब्द शोधून ते वापरणे याला भाषेची स्वाधीनता म्हणता येईल असे विचार केळकर मांडतात.

'भाषा आणि जीवन', 'भाषेशी खेळणे', 'लोकशिक्षणाची घराणी', 'पाहुणे आले आणि घरचेच झाले' यांसारख्या अतिसुगम लेखात केळकरांनी भाषेसंबंधी काही अ-तांत्रिक गोष्टी मांडल्या आहेत. त्यांचे लिखाण तांत्रिक स्वरूपाचे आणि क्लिष्ट असते या आक्षेपाबद्दल असे म्हणता येईल की कधी कधी तर केळकर सुगमतेचा अतिरेकच करतात. आता जे विषय तांत्रिकच आहेत आणि ज्यांच्या विवेचनात वैज्ञानिक तर्कशुद्धता अपेक्षित आहे त्यातील क्लिष्टता हा केळकरांचा नव्हे तर त्या विषयाचा दोष आहे. मुख्य म्हणजे 'भाषा : शक्ती आणि सत्ता', 'मराठीतील विरामचिन्हांचा उपयोग', 'मराठी भाषा आणि वाचिक अभिनय' यांसारखे लेख सुगम नसले तरी सर्वांच्याच दृष्टीने महत्त्वाचे असल्याने / अभ्यसनीय असल्याने वाचकाने त्या विचारांचा पाठपुरावा करण्यात हरकत मानू नये. लेखकाने वाचकांसाठी घेतलेल्या कष्टांची ती पावती आहे.

काही विषय मात्र केवळ त्या त्या विषयाच्या अभ्यासकालाच उपयुक्त ठरतील असे असतात. पण असे लेखही वाचकाभिमुख निष्कर्षांपर्यंत पोचतील याचीही काळजी केळकर घेतात. उदा. 'अनुवाद : शास्त्र की कला?' या प्रदीर्घ निबंधात त्यांनी परभाषेतील पुस्तकांचे अनुवाद करताना शब्दग्रहण = अर्थग्रहण, असा पहिला टप्पा, अर्थग्रहण = अर्थांकन हा

दुसरा टप्पा, अर्थांकन = शब्दांकन हा तिसरा टप्पा तर शब्दग्रहण = अर्थग्रहण हा चौथा असे विविध टप्पे मानत प्रत्येक ठिकाणी अनुवादकाराला कोणते धोके आढळतात, ते टाळण्यासाठी कोणते नियम वापरावे, चांगले भाषांतर होण्यासाठी कोणते निकष वापरावे यासारख्या चिरंतन महत्त्वाच्या विषयांची चर्चा केलेली आहे ती तांत्रिक शब्दांत. अनुवादकार, भाषाशिक्षक, शब्दकोशकार वगैरेंना उपयुक्त आहे असे म्हटले तरी, सामान्यपणे सजग आणि चाणाक्ष अशा वाचकालाही त्याच्या अभिव्यक्तींचे भाषांतर / रूपांतर करताना उपयुक्त ठरतील. विषय तांत्रिक असूनही केळकरांनी काही सुगम आणि चपखल उदाहरणेही दिलेली आहेत. उदा. minister या शब्दाचे धार्मिक संदर्भात 'धर्मोपदेशक' असे भाषांतर न करता 'मंत्री' असे करणे याचा अर्थ भाषांतरकर्त्याला ते इंग्रजी समजलेले नाही असा करायला हवा, त्याला इंग्रजी समजत नाही असा नव्हे. माझ्या वैयक्तिक अनुभवात उत्तमपैकी इंग्रजी लिहिणाऱ्या, बोलणाऱ्या तत्त्वज्ञानाच्या एका ज्येष्ठ प्राध्यापकांनी लॉकच्या clean tablet या शब्दप्रयोगाचे मराठीत 'स्वच्छ गोळी' असे भाषांतर केले होते! वस्तुतः tablet चा एक अर्थ 'एखाद्या पुतळ्याखाली लेख लिहिण्यासाठी बांधलेला चौथरा किंवा चबुतरा' असा होतो हे एखाद्या चांगल्या डिक्शनरीत सापडू शकले असते. दुसऱ्या टप्प्याचा विचार करताना मराठीतील 'घोडा' हा शब्द कन्नडमध्ये कुदिरे या स्वरूपात आढळतो तर इंग्रजीत horse होतो; पण मराठी आणि कन्नड बुद्धिबळातील घोडा आणि बंदुकीचा चाप या दोन्ही अर्थांनी घोडा आणि कुदिरे हेच शब्द वापरतात, इंग्रजी मात्र त्यासाठी knight आणि trigger किंवा cock असे अतिशय भिन्न शब्द वापरते. म्हणजे भाषांतरकर्त्याला दोन भाषा नुसत्या चांगल्या समजून भागत नाही तर त्याला उपलब्ध असणाऱ्या पर्यायातही नीरक्षीरविवेक करावा लागतो. अशांसारख्या अनेक चपखल आणि यथायोग्य उदाहरणांचा पाठपुरावा करीत जाणारा हा निबंध (पुन्हा पुन्हा) वाचनीय आणि अभ्यसनीय होतो.

'मराठीतील विरामचिन्हांचा उपयोग' हा लेखही, मराठी उत्तमपणे आणि प्रभावीपणे लिहू इच्छिणारांसाठी पुन्हा पुन्हा वाचनीय, अभ्यसनीय आहे. स्थलकालाच्या मर्यादांचा विचार करूनही ज्याचा उल्लेख केलाच पाहिजे असा 'मराठी भाषा आणि वाचिक अभिनय' हा निबंध आहे. त्यात विलंबित, मध्य आणि द्रुत अशा लयींच्या अनुषंगाने विविध अर्थांच्या छोट्या छोट्या छटा (nuances) दाखविण्यासाठी मराठी भाषिक कोणकोणती भाषिक तंत्रे वापरतात याचेही केळकरांनी सोदाहरण विवेचन केलेले आहे. त्यात श्वासखंडाची सीमा (वाक्य / पदबंध यांची सीमा), सुरखंडसीमा (वाक्यातील चढउतार दाखविणारी, सीमा) बलखंड (शब्दांची सीमा) आणि अक्षरगण (रूपिमांची (?) सीमा) अशी परिमाणे मानीत भिन्न भिन्न लयींमध्ये त्याचे सुरवितरण (intonation), बलवितरण (accent) यांचा विविध वापर करीत अर्थांच्या छटा कशा व्यक्त केल्या जातात याचे विवेचन आलेले आहे. उदा.

'तू' त्याचे 'पैसे' देऊन -टाक \ (सल्ला, विनंती)

'तू' त्याचे 'पैसे' देऊन -टाक \\ (सरळ आदेश, सल्ला)

'तू' त्याचे 'पैसे' देऊन -टाक ^ (हुकूम, याचना)

यांसाख्या अनेक गोष्टींचा सोदाहरण उपयोग दाखवीत भाषकांनी स्वतःच्या भाषाव्यवहाराकडे कसे सजगपणे पाहावे हे केळकरांनी स्पष्ट केलेले आहे.

केळकरांचे निरीक्षण मार्मिक आणि मिस्कील असते; त्यांची शब्दयोजना, वाक्यरचना तर्कसंगत असते; असे असूनही विद्वज्जडतेच्या सोसात त्यांनी सुगमतेचा वसा उतून मातून टाकलेला नाही; विषयाची निवड, त्यातील मुद्दे यासारख्या गोष्टींकडे ते वैज्ञानिक सजगतेने पाहातात; त्यांचे विचार नेहमीच पूर्ण नवे किंवा इतरांना सुचणारच नाहीत असे नसले तरी त्यांनाही यथायोग्य संदर्भाची जोड देत त्यातील विचूकता आणि ताजेपणा टिकवून धरणे यात त्यांचा हातखंडा आहे. त्यामुळे वाचक सहसा त्यांच्याशी असहमत होईल असे त्यांच्या लिखाणात फारसे आढळत नाही. (या विधानासाठी उदाहरणे प्रत्येक वाचकाने स्वतःच 'मध्यमे'त शोधावी.)

मात्र वाचक केळकरांशी नेहमीच सहमत होईल असेही नाही. विशेषतः ज्या विषयात केळकर स्वतः अग्रगण्य अधिकारी मानले जातात त्यातीलच काही मूलभूत विचारांचा विसर पडल्यासारखी विधानेही ते करू शकतात. उदा. 'भाषेत जीवन काठोकाठ भरलेले असले तर भाषाही जीवनात शिगोशीग भरून राहिलेली आहे' (पृ.२) असे ते जेव्हा म्हणतात तेव्हा त्यांना एक चटपटीत वाक्य लिहिण्याचा मोह टाळता आलेला नाही असे म्हणावे लागते. भाषा ही त्यांनी अतिसाधारण चिन्हव्यवस्था (universal semiotic system) मानलेली असावी; अन्यथा सामान्यपणे आपण जिला भाषा म्हणतो तिचे चित्रकला, गणित, विज्ञान यामध्ये फारसे काम पडत नाही आणि उत्कट भावना आणि 'शब्दांपलीकडचे ज्ञान' यांचे स्वरूप सांगण्यासाठीच 'अनिर्वचनीय', 'शब्दांच्या पलीकडले' 'यतो वाचो निवर्तन्ते' यासारखे वाग्व्यवहार केले जातात हे सर्वमान्यच आहे.

पृ. १९ वर केळकर एका मराठी भाषिक कुटुंबातील इंग्रजी माध्यमात शिकणाऱ्या विद्यार्थ्यासंबंधी लिहिताना त्यातील एकाची इंग्रजी ही 'स्वभाषा' आहे असे म्हणतात. ज्या भाषेत आपण बिनधास्त चुका न करता बोलू शकतो ती स्वभाषा असे त्यांना वाटते हे निम्नस्तरीय भाषाव्यवहारांसाठी ठीक म्हणता येईल पण अगदी 'वैखरी' पासूनचे त्यांचे लिखाण चाळले की सर्वसाधारणपणे इतर लोक जिथे 'मातृभाषा' हा शब्द वापरतील तिथे ते 'स्वभाषा' हा शब्द वापरताना आढळतात. उदा. पाहा वैखरी विशेषतः पृ. ५९ आणि नंतर ७८, ७९, ८०, ८२, ८४-८५, १०३, १०५, १११, १२८, १८२ इ. यांचे कारण म्हणजे स्वभाषा ही मातृभाषाच असली पाहिजे हे त्यांना मान्य नाही. त्यामुळे अनेक ठिकाणी ते फक्त स्वभाषा आणि परभाषा एवढाच भेद करतात. मी पारंपरिक पद्धतीनुसार मातृभाषा / प्रथमभाषा, द्वितीय भाषा आणि तृतीय भाषा / परभाषा असे भेद करतो आणि मातृभाषा = स्वभाषा किंवा प्रथम भाषा असे मानतो. त्याची कारणे इथे स्पष्ट करणे शक्य नाही. पण एखाद्या संपूर्ण समाजाने (सुद्धा) आपली मातृभाषा टाकून देऊन दुसरी एखादी भाषा

मातृभाषेप्रमाणे वापरली- उदा. इंग्रजी किंवा फ्रेंच बोलणारे अमेरिका आणि इतर देशातील इंडियन्स, नीग्रो, माओरी इ. इ. तरी तसे होणे मला अवघड आणि अनिष्ट वाटते. कारण माझ्या समजुतीप्रमाणे स्व- भाषा ही स्व-भाषा, स्व-संस्कृती यांची वाहक आहे.

हा प्रश्न नुसता भाषेतील बदलांचा किंवा पुस्तके वाचण्याच्या मर्यादेपेक्षा जास्त गंभीर आहे. हा एक जीवनप्रवाह आत्मसात करण्याचा भाग आहे. मुलाच्या आनुवांशिक व्यक्तिविशेषांइतकाच तो मूलभूत असणे शक्य आहे. त्याची वाहिका फक्त मातृभाषाच असू शकते; मातृभाषेचा अभ्यास न करता, दुसऱ्या भाषेला स्व-भाषा बनविणे हे अंतिम विश्लेषणात शक्य वाटत नाही. ज्याला मराठीही येत नाही व जो शेकडो वर्षांचा इंग्रजीचा जीवनप्रवाह अवघ्या पाच सात वर्षांत आत्मसात करायचा प्रयत्न करीत असेल त्याला दोन्ही संस्कृतीमध्ये योग्य स्थान मिळणे अशक्य वाटते. मराठीला मातृभाषा ठेवून इंग्रजीही स्व-भाषा करणे शक्य आणि वांछनीयही आहे हा मुद्दा केळकरांनी विवेचनात घेतलेले नाही, असे नव्हे पण केवळ पाच, सात (किंवा अगदी पन्नास साठ) वर्षांच्या अभ्यासाने इंग्रजीला मातृभाषा बनविण्याचा प्रयत्न हा त्यांच्याच शब्दात 'आत्मिक आणि सांस्कृतिक आत्मघात' आहे.

पृ. १०५ वर केळकरांनी 'पद्य हा भाषेच्या एकमितित्वावर विजय मिळविण्याचा माणसाचा एक... प्रयत्न आहे, उगीच नाही पद्यरचनेत नेहमीचा शब्दक्रम पुष्कळदा उधळला जात.' असे विधान केलेले आहे. विचार अनेक दिशांनी धावणे, भावभावनांना अनेक परिमाणे असणे या महत्त्वाच्या आणि तांत्रिक मुद्द्याचे विवेचन त्यांनी केलेले नाही. त्यामुळे नेहमीचा शब्दक्रम पद्यात उधळण्यासाठी फक्त हीच कारणे आहेत की नाहीत हे समजणे अवघड होते. याकोबसन यांनी रूपके आणि रूपिते (metaphor and metonymy) यांच्यावर जे विवेचन केलेले आहे ते लक्षात घेतले तर पद्यलेखकाची पद्य लेखनाची उर्मी ही विचारांच्या दिशांवर किंवा भावनांच्या परिमाणांवर अवलंबून असते असे म्हणणे दुरापास्त आहे. त्याऐवजी ती त्याच्या व्यक्तिमत्वाच्या नैसर्गिक आविष्काराचा एक भाग आहे असे म्हणायला हवे. दुसरे म्हणजे गद्यच काय पण पद्य आणि मानवाची ज्ञानप्रक्रिया आणि विचारप्रक्रिया यासुद्धा एकमितीयच असतात. (bound in temporal direction) विचारांच्या अनेक दिशांनी धावण्याच्या प्रक्रियेचे तर उत्कृष्ट उदाहरण गद्यातच अंतर्गत एकवादिता / एक वक्तृत्व (interior monologue) किंवा सजगतेचा स्त्रोत (Stream of consciousness) यांचे तंत्र वापरून लिहिलेल्या कादंबऱ्यात (उदा. युलिसीस, अपोर्ट्रेट अव दि आर्टिस्ट ॲज अ यंग मॅन) मध्ये आढळेल. पण या गद्यात काय किंवा पद्यात काय वाचक काळाच्या एका मितीतच प्रवास करीत राहतो हे निर्विवाद आहे.

'मराठी भाषेची सद्यःस्थिती, तिचे भवितव्य, सामान्य भाषाव्यवहारातील, राज्यव्यवहारातील, शिक्षणक्षेत्रातील तिचे स्थान आणि इंग्रजीशी असणारे तिचे नाते हा केळकरांचा जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. भारतीय विद्यार्थ्यांना इंग्रजी चांगले येणे आवश्यक आहे यावर दुमत नाही पण त्यासाठी शिक्षणाची नुसती वर्षे वाढवून उपयोग नाही तर

इंग्रजीच्या अध्यापनाचा कस, दर्जा वाढविला पाहिजे. अगदी प्राथमिक आणि पूर्वप्राथमिक स्तरांवरही इंग्रजी माध्यम वापरणे हा सांस्कृतिक आणि बौद्धिक आत्मघात आहे; इंग्रजी आणि मराठी दोन्ही नीट न येणाऱ्या विद्यार्थ्यांची एक नवी पिढी उदयाला येते आहे आणि आता इंडियाने भारतावर राज्य करायचे असा एक नवीन साम्राज्यवाद निर्माण होतो आहे. हे टाळायचे असेल तर पूर्वप्राथमिक, प्राथमिक आणि माध्यमिक स्तरांवर स्वभाषा ही शिक्षणाचे माध्यम असावी, पण इंग्रजी इच्छानुसार पर्याय म्हणून उपलब्ध व्हावी, उच्च माध्यमिक आणि उच्च स्तरावर विद्यार्थ्यांच्या कुवतीचा विचार करून त्याला इंग्रजी किंवा मराठी माध्यमाचा पर्याय उपलब्ध व्हावे असे विवेचन करणाऱ्या केळकरांशी असहमत होणे अशक्य आहे. पण तरीही त्यांनी काही महत्त्वाच्या मुद्यांचा उल्लेखच केलेला नाही; ज्यांचा झालेला आहे त्यांचे यथायोग्य विवेचन केलेले नाही आणि काही समस्यांचा तर उल्लेखही केलेला नाही तेव्हा त्यांची उत्तरे देण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. पण त्या समस्यांचा इथे उल्लेख करायलाच हवा.

मराठी आणि इंग्रजी यांची तुलना करताना मराठीला नेहमीच सापत्नभावाची वागणूक मिळते; पण त्यातील त्याहूनही विदारक वाटणारे सत्य हे आहे की हा सापत्न भाव बऱ्याच वेळा मराठी भाषिकच दाखवितात. मराठीच्या दुर्दैवाच्या दशावतारांबद्दल अनेक विचारवंतांनी अनेक व्यासपीठांवरून त्यांच्या त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीत अनेक विचार व्यक्त केलेलेच आहेत. पण विचारवंतांचा, भाषातज्ज्ञांचा, भाषाशिक्षकांचा आणि कदाचित् इतरही विषयांच्या शिक्षकांचा सरसकटपणे इंग्रजी माध्यम वापरण्याच्या, मनोवृत्तीला जो जो जास्त जास्त विरोध आढळायला लागतो, तो तो मराठीभाषकांचे इंग्रजीसंबंधीचे प्रेम शुष्क रानातील वणव्यासारखे जास्त जास्तच भडकत चालले आहे असे दृष्टोत्पत्तीस येते. चर्नीरोडच्या लोकल स्टेशनवर एका महाविद्यालयीन युगुलाला इंग्रजी येत नसताही त्यांचे प्रेमाचे भांडण इंग्रजीत चालल्याचे पाहिल्यावर तर हा दावानल किती सर्वभक्षी स्वरूपात थैमान घालू लागलाय याची प्रचीती पटते. बहुतेक सर्व विचारवंतांचा एवढा विरोध असूनही इंग्रजीचे हे स्तोम का वाढत आहे आणि त्यावर काय ठोस उपाययोजना करायला हवी याची कारणे तात्त्वज्ञानिक, भाषावैज्ञानिक किंवा भाषाशैक्षणिक चर्चेमध्ये सापडणार नाहीत तर ती सामाजिक, ऐतिहासिक, आर्थिक विचारांच्या चर्चेत सापडतील, याची सविस्तर चर्चा कोणी करीत नाही- पण त्याहीपलीकडे जाऊन त्याची काही मुळे आम्हा महाराष्ट्रीयांच्या मानसिकतेतच खोलवर रुजलेली आहेत याकडेही कोणी लक्ष देत नाही. 'मध्यमा' वाचताना सतत जाणवत राहाते की केळकर काही काही वेळा या प्रश्नांचा जाणीवपूर्वक उल्लेख करीत आहेत, पण मोठ्या उत्सुकतेने त्याचा पाठ पुरावा करायचा म्हटले तर पदरी निराशा येते कारण ते या प्रश्नांचे गांभीर्यपूर्ण विवेचन करताना मात्र आढळत नाहीत.

एक म्हणजे समाजाच्या एका मोठ्या घटकाला संस्कृतचे ज्ञान नाकारून त्याच्यावर उच्चवर्णीयांनी हजारो वर्षे राज्य केले हा इतिहास आहे. प्रत्यक्षात राज्यकारभारासाठी संस्कृत / इंग्रजी यांची आवश्यकता कदाचित नसेलही पण त्यांची आवश्यकता गृहीत धरली तर

मात्र भस्मासुरासारखे अनेक प्रश्न दत्त म्हणून उभे राहातात. सद्यःपरिस्थितीत स्वतः इंग्रजीवर प्रभुत्व मिळवून बाह्यात्कारी समाजकल्याणाच्या मिषाने पुन्हा एकदा संस्कृतसदृश अशा एका भाषेपासून आपल्याला वंचित करायचे आणि पुन्हा एकदा आपल्यावर राज्य करायचे असा उच्चवर्णीयांचा डाव असावा अशी शंका दलित समाजाला येणे स्वाभाविक आहे. किंबहुना इंग्रजीला असणारा उच्चवर्णीयांचा तथाकथित विरोध हा त्यांच्या आपमतलबी राजकरणाचा / दांभिकपणाचा भाग आहे असे माझ्या माहितीचे काही दलित प्राध्यापक स्पष्टपणे बोलूनही दाखवितात. त्यामुळे उच्चवर्णीयांच्या इंग्रजीला असणाऱ्या टोकाच्या विरोधाला प्रतिक्रिया म्हणून तितक्याच टोकाला जाऊन, कडवटपणे इंग्रजी आत्मसात करण्याचा विडा त्यांनी उचललेला आहे. याला प्रमुख कारण म्हणजे 'अंग्रेजी हटाओ'ची घोषणा करणाऱ्या अनेक बोलघेवड्या समाजधुरंधरांची स्वतःची मुले इंग्रजी माध्यमांच्या शाळेतच शिकत असतात हे आहे.

तत्वतः 'अंग्रेजी हटाओ' हे मान्य करूनही आपली मुले मात्र इंग्रजी माध्यमाच्या शाळेत पाठविणे यातही मराठी मानसिकतेचे अनेक धागे गुंतलेले आहेत. अगदी त्यातील राजकीय आणि आर्थिक लाभांचा विचार नाही केला तरी आम्हा महाराष्ट्रीयनांना इंग्रजी 'येणे' ही गोष्ट स्वतःच (in itself) अभिनंदनीय आणि आनंददायक वाटते हे नाकारण्यात अर्थ नाही. 'आपल्याला मराठी चांगले येत नाही याबद्दल मराठी भाषिकांनी अभिमान बाळगण्याचे दिवस १९४७ सालीच संपले' असे केळकर मानत असतील; पण आम्हा मराठी भाषिकांची मानसिक गुलामगिरी अगदी १९९६ मध्ये तरी संपल्याचे मला कधी आढळलेले नाही, एका शुद्ध मराठी कुटुंबात जन्म घेऊन, स्वतः मराठी भाषक असून - विशेष म्हणजे, स्वतःचे इंग्रजी फारसे चांगले नसूनही, महाराष्ट्रातील एका मान्यवर विद्यापीठाच्या एका अत्युच्च दर्जाच्या अधिकाऱ्यांनी आपल्याला मराठी येत नाही म्हणून शेखी मिरविण्याचा आणि इतरांचे इंग्रजी चांगले नाही असे म्हणून त्यांना तुच्छ लेखण्याचा प्रकार मी याचि देही याची डोळा पाहिलेला आहे. गोऱ्या कातडीच्या लोकांबरोबर बोलताना आपल्या काळपट (खरे तर ठार काळे) असणाऱ्या सहकाऱ्यांकडे पद्धतशीर तुच्छतेने दुर्लक्ष करणे हाही त्यातलाच एक प्रकार. ज्या विद्यार्थ्यांना कालपर्यंत आपणच निर्बुद्ध समजत होतो त्यांना आज परदेशी विद्यापीठातून मान्यता मिळायला लागली की आपणही त्यांचे कौतुक करणे हेही अनुभवास येते. जणु माझ्या विद्यार्थ्यांचे मला यथायोग्य मूल्यमापन करता येणारच नाही. त्यासाठी एखाद्या गोऱ्या परीक्षकाची गरज आहे. असा एक चमत्कारिक गंड आमच्या प्राध्यापक मंडळीच्या डोक्यात ठाण मांडून बसला असावा. आमच्या विद्यार्थ्यांच्या प्रबंधांचे मूल्यमापन खरे म्हणजे परकीय विद्यापीठांकडून करून घ्यायला हवे, हा राजमार्ग म्हणजे हा प्रश्न पुन्हा उद्‌भवणार नाही. सारांश आमच्या बुद्धिमंतांचे पात्रच काय पण आनखशिख शरीरसुद्धा मातीचेच आहे असे वाटायला लागते. महाराष्ट्राची अस्मिता, महाराष्ट्राची सांस्कृतिक परंपरा वगैरे गोष्टी बोलायला ठीक आहेत. प्रत्यक्षात अगदी शिवाजीच्या नात्यातील काही तरुणसुद्धा फक्त जन्माने आणि धर्माने हिंदू तर पेहराव, भाषा,

चालचलन यांनी तद्दन मुसलमानी होते अशी इतिहासाची साक्ष आहे. मराठी अस्मिता म्हणून पदार्थ कधी अस्तित्वातच नव्हता आणि यापुढे तरी तो कधी येईल असा भरवसा वाटत नाही. मग याच गुलामी मानसिकतेचे आमचे राज्यकर्तेसुद्धा (सध्याचे शासकीय मराठी वापरणारे अ-सन्माननीय अपवाद सोडून) कधी संस्कृत कधी पारसी तर कधी इंग्रजी अशा समाजविमुख भाषातून राज्य करताना आढळतात. इंग्रजी शिकून आपला मुलगा 'देशी साहेब' व्हावा अशी स्वप्ने पालकांना पडू लागतात. मराठी अस्मितेची ऐशी तैशी. जणू काही सर्वज्ञतेचा मक्ता आणि पर्यायाने राज्यशकट हाकण्याची कुवत ही इंग्रजी शिकणाऱ्यांची मक्तेदारी आहे.

असो. केळकरांच्या मराठीविषयीच्या चिंतनातून माझे जे काही निष्कर्ष निघतात ते इथे नमूद करायला हवेत. एक म्हणजे समाजाच्या सर्व घटकांना त्यांच्याच हितासाठी 'अंग्रेजी हटाओ' आवश्यक आहे असे वाटू शकेल अशा प्रकारचा राजकारणविरहित शैक्षणिक, सांस्कृतिक कार्यक्रम आखणे आवश्यक आहे. यासाठी कदाचित आमच्या बुद्धिमंतांचेच प्रबोधन प्रथम करावे लागेल. कारण त्यांच्या वैयक्तिक आचरणावरच त्यांच्या भाषणातील सत्य पडताळून पाहाता येईल.

दुसरे सत्य असे की मराठी माणूस मराठीसंबंधात फारच उदासीन असतो. फ्रेंच भाषेचे स्वरूप, भाषेची शुद्धता, अस्मिता वगैरेसंबंधी फ्रेंच माणूस जितका जागरूक असतो तितका मराठी माणूस जागरूक नसला तरी चालेल. पण तो कन्नड, मल्याळम, बंगाली भाषक त्यांच्या भाषेसंबंधी जितके जागरूक असतात तितकाही जागरूक नसतो. केळकरांचेच उदाहरण घ्यायचे तर त्यांचे लिखाण कितीही तर्क शुद्ध, उपयुक्त (आणि सुगमही) असले तरी त्याचे सार किती जणांपर्यंत पोचते? म्हणजे खऱ्या अर्थाने भाषेसंबंधी किंवा त्यातल्या त्यात मराठीबद्दल (सुगम असले तरी) गंभीर स्वरूपाचे विवेचन मराठीचे किती अभिमानी वाचतात? अशा परिस्थितीत केळकरांसारख्यांचे लिखाण अरण्यरुदित ठरणे हेच अपेक्षित आहे.

तिसरा मुद्दा असा की मराठी माध्यमासंबंधीचे शिक्षणतज्ञांचे विचार हे बहुतांशी ज्यांचे आधीच हृदयपरिवर्तन झालेले आहे अशा वाचकांनाच पटण्याची शक्यता जास्त. मराठी राजभाषा असली तरी आपण राजे आहोत हे मराठी भाषकांना अद्याप उमगलेले नसल्याने ते मायबोली म्हातारीला घराच्या चार भिंतीतच ठेवतात आणि मावशीची भाषा मात्र इतर सर्वत्र वापरतात. काही काहीनी तर घरातूनसुद्धा आमच्या निरुपयोगी म्हातारीचे उच्चाटन करायचा घाट घातलेला आहे. त्या सुखसुबत्तांचा लाभ इंग्रजीच्या अभ्यासाने होणार अशी आमची निदान समजूत तरी असते त्या सुखसुबत्तांचा लाभ मराठी शिकूनही होतो असे पटल्याखेरीज आम्ही इंग्रजीचा निदिध्यास करण्याचे व्रत सोडू ही अपेक्षा ठेवणे वस्तुनिष्ठ नाही, पण हा प्रत्येकाच्या वैयक्तिक स्वातंत्र्याचा प्रश्न आहे. अशा महापुरुषांना मराठीकडे वळविण्यासाठी इंग्रजी माध्यमाच्या पुस्तकांवर 'इंग्रजी माध्यम तुमच्या वैयक्तिक आणि सामाजिक विकासाला घातक आहे' असा वैधानिक इशारा लिहून फारसे काम होईल असे

वाटत नाही. कारण (कदाचित) असे इशारे वाचूनच इतरांच्या स्वास्थ्याला धोका पोचवण्याचा आपल्याला जन्मसिद्ध अधिकार / स्वातंत्र्य आहे अशा थाटात अनेक धुराडी धूर ओकताना आढळतातच. या स्वरूपाच्या बाटग्यांसाठी काय प्रयत्न करता येतील याचाही विचार झाला पाहिजे.

तिसरे म्हणजे इंग्रजी म्हणजे वाघिणीचे दूध आहे हे अमान्य करण्याचे कारण नाही, पण ज्याने आईचे दूधही पचविलेले नाही त्याला वाघिणीच्या दुधाचा काय उपयोग होणार, हे समजत नाही. ज्यांचे मराठी चांगले आहे त्यांनाच इंग्रजी जास्त सहज समजते किंवा ज्यांचे इंग्रजी चांगले आहे त्यांचे मराठीसुद्धा काही कारणांनी चांगले असल्याचे आढळून येते. तेव्हा समाजाच्या सर्वच घटकांना इंग्रजी चांगले यायला हवे असेल तर त्यांनी मराठीचा अभ्यास प्रथम केला पाहिजे हे आपण त्यांना पटवून देऊ शकणे आवश्यक आहे. हाही भाग केळकरांच्या विवेचनात आलेला नाही. त्यांचे या विषयांवरील विचार अभ्यसनीय आणि मार्गदर्शक ठरतील म्हणूनच या टीकेचा हा प्रपंच.

केळकरांनी अमुक एक केलेच नाही आणि दुसरे काही केले तर ते फारसे समाधानकारक नाही अशी टीका करणे सोपे आहे. परंतु आपण एखाद्या उंच माणसाच्या (भाषांतराच्या शब्दग्रहण = अर्थग्रहण या टप्प्याचा विचार करता 'राक्षसाच्या') खांद्यावर उभे राहिल्यावर आपण फार दूरवरचे पाहू शकतो हे खरे असले तरी त्यासाठी वापरलेला खांदा विसरण्यात अर्थ नाही. केळकरांबरोबर सहमत होणे ही एक आनंदाची गोष्ट आहे हे खरे पण त्यांच्याशी असहमत होणे ही त्यांनासुद्धा जास्तच आनंदाची गोष्ट आहे. कारण त्यां रूपाने टीकाकाराने त्यांनी वाचकांसाठी घेतलेल्या कष्टांची पावती दिलेली असते. अशी पावती देण्याची संधी वरचेवर मिळावी यासाठी 'पंश्यंती' आणि 'परा' यांचे प्रकाशन शक्य तितक्या लवकर होवो अशा सदिच्छा व्यक्त करणे हेच मला या परिस्थितीत जास्त आवडेल.

**भाषाशिक्षण विभाग एस्. एन्. डी. टी. महिला विद्यापीठ, मुंबई ४०००२०.**

❒❒

---

## सुसुन्दरीच्या सुसरी गळ्यात

चापेकरांवरून (श्री. नी.) आठवले. शब्दाला वजन देण्यासाठी त्याच्या आरंभी 'सु' हे अक्षर लावण्याची त्यांना विद्वान खोड होती. अनेकांनी ती उचलली. धारदार विनोदबुद्धी व काव्यगुणही असलेले पण त्यांच्या (आणि त्याहीपेक्षा मराठी कवितेच्या) दुर्दैवाने उपेक्षित राहिलेले विदर्भातले कवी, जयकृष्ण केशव उपाध्ये, यांनी त्या खोडीचे एका ओळीत विडंबन केले. 'सुसुन्दरीच्या सुसरी गळ्यात' तेच 'सत्' या पूर्वपदाचे 'सदंगिं माझ्या सत्कोट'.

**प्रा.मं.वि. राजाध्यक्ष – भाषाविवेक, श्री विद्या प्रकाशन, पुणे १९९७ पृ. १६४**

## पैसे भरण्याबद्दल सूचना :

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनिऑर्डरकूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी :

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

- चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.
- चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला ६० रु.
- सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) १५ रु.
- परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.
- परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.
- सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

## परिषदेची वर्गणी :

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला. तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी १०० डॉलर), हितचिंतकासाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त, आश्रयदात्यांसाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त.

(आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर :

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक : 0-40048/83

## ● आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार?

➢ सभासद नसाल, तर प्रथम स्वतः सभासद व्हा.

➢ सभासद असाल, तर देणगीदार / आश्रयदाते सभासद आणि साधारण / आजीव सभासद मिळवून द्या.

➢ परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर चिटणिसांशी संपर्क साधा.

➢ परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.

➢ परिषदेने प्रकाशित केलेल्यां पुस्तकांच्या विक्रीसाठी सहाय्य करा.

➢ परिषदेचे काम वाढविण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

## ● आपण पत्रिकेसाठी काय करू शकता?

➢ लेखन पाठवा.

➢ परभाषांतून अनुवाद करा.

➢ ग्रंथपरीक्षणे लिहा.

➢ 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजुकराबद्दल सूचना पाठवा.

➢ भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे, इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.

➢ पत्रिकेत भाषा व्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते?

➢ जाहिरात मिळवून द्या.

➢ संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.

● संपर्क ●

मराठी अभ्यास परिषद
१, शीतल अपार्टमेंट,
४६/४,एरंडवणे, पुणे - ४११ ००४.
(दूरध्वनी : ३३ ३८ ६९)



अनुक्रमणिका